प्रकाशक

सौ. सविता सु. जोशी
उत्कर्ष प्रकाशन
रेणुका अपार्टमेंट्स
भांडारकर रस्ता
पुणे ४११ ००४.



'दोस्त हो!'

मूल्य आठ रुपये

प्रकाशन द्वितीयावृत्ती २६ जानेवारी १९८२



मुद्रक

प्रमोद वि. बापट
प्रमोद प्रिंटर्स
१०१९, सदाशिव पेठ,
पुणे ४११ ०३०.

'मराठी शायरी, मराठी मुशायरा आणि मैफिल'
या पूर्वीच्या तिन्ही प्रकाशनांना रसिक
श्रोत्यांनी जी उत्स्फूर्त दाद दिली, त्या
जिंदादिल मनोवृत्तीस 'दोस्त हो'
सादर समर्पण !

# ‘दोस्त हो!’

भाऊसाहेब पाटणकर

मराठी शायरी या काव्यप्रकारातील ४ थे पुस्तक “ दोस्त हो ” मी आज प्रकाशित करीत आहे. या पुस्तकात याच्या अगोदरच्या ‘मराठी शायरी’,‘ मराठी मुशायरा’,‘ मैफिल’ या तीनही पुस्तकांतील काव्य संकलित करून, काही नवीन रचना उद्‌धृत केली आहे.

पहिली तीनही पुस्तके संपल्यामुळे हे पुस्तक मुद्दाम प्रकाशित करण्यात येत आहे. या काव्यप्रकाराबद्दल मराठी भाषिकांत माझ्या अपेक्षेप्रमाणे आकर्षण दिसून आले, इतके की, अनेकांना शायरी कोठून तरी पुस्तक मिळवून स्वहस्ताने लिहावी लागली.

माझ्या ‘ मराठी मुशायरा ’ व ‘ मैफिल ’ या पुस्तकांत माझे चिंतन योग्य त्या विस्ताराने मांडले होते. दार्शनिक पद्धतीने याचे खालील लक्षण संस्कृतातून करून दाखविले होते:

भावोन्मादोत्थित कल्पनाचमत्काराविष्कार विशेषः शायरी ।

कल्पना चमत्कृतित्वंतु विस्मय सहकृत सदभिव्यंजकत्वं ।।

वरील लक्षणसमन्वय काही संस्कृत काव्या-तूनही कसा होतो हे सोदाहरण दाखवून या काव्यप्रकाराचे जनकत्व संस्कृत कवींच्याकडेच आहे असा माझा संशोधनात्मक निर्णयही मी जाहीर करून टाकला होता. या माझ्या परिश्रमाकडे संस्कृतभाषाकोविदांचे तरी लक्ष जाईल अशी मला अंधुक आशा होती. माझ्या लक्षणातील दोष दिग्दर्शन करून लक्षणसमन्वय संस्कृत काव्यात होत नाही अशाही निर्णयाला कोणी विद्वान आला असता तरी मला समाधान वाटले असते. शायरी या काव्यप्रकारची आणखी स्पष्ट कल्पना येण्यास त्याची मदतच झाली असती. पण तसे न झाल्याने या पुस्तकात शायरी काव्यप्रकाराच्या सौंदर्याच्या कारण-सामग्रीची मी शास्त्रीय मीमांसा करीत नाही. या काव्यप्रकार निर्मितीला मराठी भाषा असमर्थ आहे या भ्रमाबद्दलही मी ' मराठी मुशायरा ' या पुस्तकात सोपपत्तिक विवेचन केले होते. हा भ्रम का निर्माण झाला, तो जाणीवपूर्वक कसा जोपासला गेला, आणि तो दिवसेंदिवस कसा दृढमूल होत गेला याचेही विवेचन मी केले होते. तो खरोखरच भ्रम होता हे आता माझ्या शायरीच्या कार्यक्रमांनी महाराष्ट्रात व महाराष्ट्राबाहेर सप्रमाण सिद्ध झाले आहे. त्याचेही पुर्नविवेचन मी येथे करीत नाही.

या माझ्या परिश्रमाचे योग्य ते मूल्यमापन एका श्रेष्ठ साहित्य समीक्षकाकडून करून

घेण्याचे सद्भाग्य मला लाभले, याबद्दल मी प्रा. श्री. श्री. के. क्षीरसागर यांचा कृतज्ञ आहे. पुण्यातील माझ्या वास्तव्यात प्राचार्य श्री. सुरू यांनाही मला मैफिलीत शायरी ऐकविण्याचा योग आला. त्यांच्या समारोपातील उत्स्फूर्त प्रशंसोद्गराने मला माझ्या परिश्रमांचे चीज झाल्यासारखे वाटले. उर्दू काव्यावर प्रभुत्व असलेले श्रेष्ठ साहित्यिक श्री. श्रीपाद जोशी हे अनेक ठिकाणी माझ्या मैफिलीचे अध्यक्ष होते. त्यांनी त्यांच्या भाषणातून या काव्यकृतीचे केलेले मूल्यमापन मला अतिशय उत्साहवर्धक वाटले.

एका मैफिलीच्या समारोपात अध्यक्ष म्हणून केलेल्या भाषणात लोककवी 'मनमोहन' यांनी केलेला उत्स्फूर्त शेर ऐकून मी अक्षरश: स्तिमित झालो. कथाकार व. पु. काळे, श्री. मधुकर टिल्लू, नाटककार विद्याधर गोखले' राघवेंद्र चव्हाण, दादासाहेब परांजपे, मनोहर पटवर्धन; प्रकाश लागू, प्रसिद्ध व अप्रसिद्ध रसिकांनी मराठी शायरीला उचलून धरले आणि त्यामुळेच महाराष्ट्रात व महाराष्ट्राबाहेरही मैफिली गाजविण्यात मला धन्यता वाटली. ही माझी काव्यकृती अनेक तरुणांच्या मनात या निर्मितीबद्दल विश्वास उत्पन्न करीत आहे हे पाहून मला समाधान वाटते. आज ना उद्या मराठी मुशायरे होतील अशी आशा बाळगून हे निवेदन पूर्ण करतो.

*

# ' दोस्त हो ! '

## अनुक्रम

# द्वितीयार्ध

# शायरी रसिकांसाठी थोडेसे

उन्मेष ज्यांच्या यौवनाचा कांहीच ना झाला कमी ।
प्यायले जे खूप ज्यांना वाटे परी झाली कमी
निर्मिली, मी फक्त माझी त्यांच्याच साठी शायरी
सांगतो इतरास ' बाबा ' वाचा सुखे ' ज्ञानेश्वरी '

शहाजहानच्या कोमल भावना शिल्परूपाने जगापुढे उभ्या आहेत, आमचेही हे शब्दशिल्प पहा–

अंतरींच्या यातनांना अमरता द्याया खरी
निर्मिला मी ताज माझ्या शायरीचा त्यावरी
वेगळा हा ताज हाही या जरा घ्या पाहुनी
यमुनेसवे गंगाही येथे वाहते नयनांतुनी

चारुता तैसीच आहे, आहे जशी त्या ताजची
आहे स्मृतीही अंतरी या कोण्यातरी मुमताजची
विरहातले सौंदर्य जेव्हां कोठे कधी साकारते
साकारते शिल्पात, तैसे शब्दांतही साकारते

मीही मिनारी उंच माझ्या कल्पनांच्या या अशा
शोधतो आस्मान काही आशेत या वेड्या अशा
व्यर्थ ना हे उंच इतुके उभविले मीनार मी
वाटले, त्या अप्सरेला, इथुनी तरी पाहीन मी

हे खरे नाही कुठेही येथून ती दिसली मला
हे ही खरे की खेद याचा काही जरा झाला मला

एसे जरी संतोष आता मानतो इतुकाच मी
दूरपण माझे तिचे इतुके तरी झाले कमी

निर्मूनिया हे शिल्प झालो, अंति असा उद्विग्न मी
वाटले की व्यर्थ श्रमलो निर्मिण्या हे शिल्प मी
असता खरा संतोष मजला तेव्हांच काही अंतरी
केव्हांतरी तीही जरी का पाहुनी जाती तरी

आसवे नयनात जर या निर्मिली नसती कुणी
नावही त्या शायरीचे ऐकिले नसते कुणी
ज्यांनी दिला हा दर्द, नयनी आसवे हि निर्मिली
मी नव्हे ही शायरीही त्यांनीच आहे निर्मिली

सांगेल काही भव्य ऐसी शायरी माझी नव्हे
तो कवींचा मान तितुकी पायरी माझी नव्हे । १ ।
आम्ही अरे साध्याच अपुल्या जीवना सम्मानितो
संमानितो हासू तसे या आसवां सम्मानितो । २ ।
जाणतो अंति अम्हांला मातीच आहे व्हायचे
नाहीतरी दुनियेत दुसरे काय असते व्हायचे । ३ ।
मानतो देवासही ना मानतो ऐसे नव्हे
मानतो इतुकेच कीं, तो आमुचा कोणी नव्हे । ४ ।
आहो असे बेधुंद, अमुची धुंदही साधी नव्हे
मेलो तरी वाटेल मेला, दुसरा कुणी आम्ही नव्हे । ५ ।

सन्मानिले वैराग्य आम्ही, शृंगारही सन्मानिला
अंकावरी आहे रतीच्या बुद्ध येथे झोपला

विसरला दुनियेस, अपुल्या गुंजनाही विसरला
कमलकोषी भृंग आता कमलासही त्या विसरला
हे हवे वैराग्य आम्हां निष्कामता ऐसी हवी
तैसी नको नुसतीच जेथे दाढी हवी लुंगी हवी

शायरश्रेष्ठ गालिबला लाभलेली कीर्ती आमच्याही वाट्यास येईल पण...

'गालिब, अरे, अमुच्याहि दारी, आहेच कीर्ती यायची
फक्त आहे देर थोडी, मरणास अमुच्या यायची
येणार ना अमुच्या पुढे ती, प्राण असती तोवरी
कीर्ती प्रिया माझी अरे, ही भलतीच आहे लाजरी'

दुर्लक्षिले जेव्हा अम्हीही साहित्यिकांना या अशा
मैफिलीही, जागजागी रंगल्या जेव्हां अशा
तेव्हां कुठे किर्तीप्रियाही हासुनी आली पुढे
नुसतीच ना आली तशी गालही केला पुढे

सांगूच का साहित्यिकांना काय या नक्की हवे
नुसते नको साहित्य यांना काही तरी जास्ती हवे
सम्मानिले असते आम्हांही इतुके जरी असते तरी
असते कुठे शेपूट, नुसता शेपटा असता तरी

शायरी ऐकून माझी सांगेल जो आता पुरे
तो रतीला चुंबिताही सांगेल की आता पुरे
तोंडही भगवन्, अरे, त्याचे मला दावू नको
ना जरी मंजूर हे ही माझे तया दावू नको

दोस्तहो, तो शेपटाही लावला आणून मी
ऐसे नव्हे गंगावनाची आता तरी आहे कमी
आता तरी वाटे उपेक्षा नशिबात या माझ्या नको
कळते आता साहित्यिकांना शेपटा नुसता नको

* *

# शृंगार

१ हसतील ना कुसुमे जरी, ना जरी म्हणतील 'ये'
पाऊल ना टाकू तिथे, बाग ती आमुची नव्हे
भ्रमरा परी सौंदर्य वेडे, आहो जरी ऐसे अम्ही
इष्कातही नाही कुठे, भिक्षुकी केली अम्ही

२ खेळलो इष्कात आम्ही, बेधुंद येथे खेळलो
लोळलो मस्तीत नाही पायी कुणाच्या लोळलो
अस्मिता इष्कात साऱ्या, केव्हाच नाही विसरलो
आली तशीही वेळ तेव्हा इष्क सारा विसरलो

३ रडलो आम्ही इष्कात, जेव्हा आम्हां रडावे वाटले
तेव्हा नव्हे इष्कास जेव्हा आम्ही रडावे वाटले
आसूवरी अधिकार हाही, इष्कात ज्याला साधला
नुसताच नाही इष्क, त्याला मोक्ष आहे साधला

४ बर्बादिची दीक्षा जशी इष्कात आम्ही घेतली
इष्कही बर्बाद करण्या, माघार नाही घेतली
ना रडू नुसतेच आम्ही, हाय ना नुसते करू
आहो शिवाचे भक्त आम्ही, हेही करू तेही करू

५ नव्हता तसा केवीलवाणा, इष्क केव्हा आमुचा
होता पुरे प्रणयात सारा, नुसता इशारा आमुचा
दोस्तहो, या अप्सरांनी नाही आम्हांला रडविले
रडविले जे काय अमुच्या संयमाने रडविले

हे खरे आहो अम्हीही इष्कात या रडलो कधी
रडलो असे इष्कात नाही नयनासही कळले कधी
(इष्कातले वैफल्य आम्हांला तरी अध्यात्माची ओढ लावते.)

६ सारखा होता पुढे चेहरा हसरा तिचा
होतो अशा मस्तीत जैसा वेणीतला गजरा तिचा
प्राशुनि बेधुंद होतो मदिरा तिच्या अधरातली
नव्हतो जसा दुनियेत होतो कल्पवृक्षाच्या तली
चांदणे नुसतेच होते जीवनी या पसरले
वाटले दुर्दैव जैसे साफ मजला विसरले
अर्थ दुसरा जीवनाचा कळलाच ना मजला कधी
आज तो कळला तसा ना कळो कोणा कधी

७ नजरही ज्यांच्यावरोनी वाटले काढू नये
वाटते की आज त्यांचे नावही काढू नये
दोस्तहो इष्कात साऱ्या हेच असते व्हायचे
हेही जरी ना व्हायचे तर काय दुसरे व्हायचे
नुसताच नाही इष्क सारा समजला आता मला
वैय्यर्थ साऱ्या जीवनाचा समजला आता मला
ना कुठे गेलो कुण्या साधूकडे ना पोचलो
नुसताच केला इष्क, आणि या पदाला पोचलो

८ जळलो असे इष्कात जैसे कोळसे झालो अम्ही
सागरी आता भवाच्या बुडणारही नाही अम्ही
समजू नका कोणास काही भलते कधी सांगेन मी

उतरावया भवपार नुसता, इष्कही नाही कमी
(अखेर आमच्या इष्काचे विषय कोण होऊ शकते)

९ मानु अम्ही की इष्क अमुचा, त्यांनाच आहे समजला
नजरेतला या भाव ज्यांना, न पाहताही समजला
कौशल्यही या अभिनयाचे काय मी सांगू तिच्या
भावही या समजण्याचा वदनावरी नव्हता तिच्या

१० लपविली होती जरी का प्रणयार्तता मी आमुची
आले तिच्या नजरेस कोठे नजर होती आमुची
शालीनता सांभाळुनीही सम्मानिले आम्हां तिने
निखळत्या पदरास नाही स्पर्शही केला तिने

११ संमती ज्या कुशलतेने होती तिने आम्हां दिली
कुशलतेने त्याच मी ही जाहीर ना होऊ दिली
नुसतेच ना इष्कास अमुच्या ऐसे तिने सम्मानिले
आमुच्या अपुल्या स्वतःच्या शीलासही सम्मानिले
त्यांशी करावा इष्क ज्यांनी इष्कातही काही पुढे
ना टाकले, ना टाकू दिले, पाऊलही याच्या पुढे

१२ दोस्तहो, दुसऱ्याक्षणी तो इष्क आम्ही विसरलो
ऐसे जरी ऐसे नव्हे की एकमेका विसरलो
आग आहे इष्क, उपमा काय दुसरी द्यायची
पेटूनियाही यात नसते राख होऊ द्यायची

## दर्द

१३ आसूविना इष्कात आम्ही काय दुसरे मिळविले

दोस्तहो माझे असो तेही तुम्ही ना मिळविले
आता कुठे नयनात माझ्या चमकली ही आसवे
आजवरी यांच्याचसाठी गाळीत होतो आसवे

१४ रोखले नयनात आसू, मी शब्द ओठी रोखले
बघितले नाही तिला मी नजरेस माझ्या रोखले
सांगूच का या संयमाला का असा मी सोसला
होती अम्हां जाणीव, आम्हां इन्कार नसता सोसला

१५ जे मिळाले त्यातही धन्यता मानु अम्ही
केलास जो इन्कार त्याचे दुःख ना मानु अम्ही
ऐसे नव्हे की अम्हां इन्कार तू नुसता दिला
नसता दिला कोणीच ऐसा दर्द तू अम्हां दिला

१६ देऊनिया हा दर्द आम्हां काय तू नाही दिले
नाही तरी याहून जास्ती काय तू असते दिले
औदार्यही तव अंतरीचे काय मी सांगू तुला
देऊनिया हा दर्द त्याची जाणीवही नाही तुला

१७ नाहीतरी इष्कात होता दर्द आम्हांला हवा
पाकळ्यांचे काय, त्यांचा गंध आम्हांला हवा.
हाच आहे साथ आहे याचाच आता भरवसा
शुक्रिया हे अप्सरांनो, तुमचा कशाचा भरवसा

१८ दुर्लक्षिले त्यांनी तरीही काही अम्हां ना वाटले
तूही असे करशील मृत्यो, केव्हाच ना वाटले ।१।
होता तुझा विश्वास, वाटे दैन्य ना दावू कुणा

आसवे नयनातली या कळणारही नाही कुणा । २ ।
झालास तू त्यांचाच अमुची नाही स्मृतीही राहिली
होती तुझी जी काय आशा तीही कुठे ना राहिली ।३।
ओळखी यांची नवी, आम्हां नवा नाहीस तू
सोबती जन्मांतरीचा आजचा नाहीस तू । ४ ।
हाय ! तू आहे तरीही आम्हां असा धोका दिला
सांग ना मृत्यो, तुला आहे कधी का मी दिला । ५ ।
जन्मांतरी ज्या ज्या क्षणी मी दूत तुमचा पाहिला
हातचे टाकून आलो मी स्वार्थ नाही पाहिला । ६ ।
दोष ना देऊ जरी का आहेस आम्हां विसरला
देवेन्द्र ही नादात यांच्या इमान आहे विसरला । ७ ।
अप्सरांना त्याच आम्ही आदाब केला शेवटी
मृत्यूवरीही हाय माझ्या त्यांचीच सत्ता शेवटी । ८ ।

१९ तू तरी या अप्सरांच्या नादी असा लागू नको
सांगूच का मृत्यो तुला मी का असे म्हणतो नको
दुर्दशा अमुच्यापरी ऐसी जरी आली तुला
कुठवरी रडशील वेड्या मरणही नाही तुला

## लज्जा

२० लाजायचे नव्हतेस आम्ही नुसतेच तुजला बघितले
वाटते की व्यर्थ आम्ही नुसतेच तुजला बघितले

२१ उपमा तुझ्या वदनास त्याची मीही दिली असती सुखे
थोडे जरी चंद्रास येते लाजता तुजसारखे

२२ येते तुझ्या स्वप्नात मी ही का म्हणू नाही तरी
पडदा जरी का तू तिथेही दूर ना केला तरी

२३ जेव्हा कधी या दर्पणी माझे मला मी पाहिले
लाजले जैसे मला दुसऱ्याच कोणी पाहिले
पडदा तरीही मी मुखाचा काढून नव्हता घेतला
प्रत्येकदा त्या दर्पणाला पडद्यात होता घेतला

२४ नजरही नाही कुणाच्या नजरेस मी केंव्हा दिली
दर्पणी आता जशी नजरेस मी माझ्या दिली
नजरा परी जुळता तिथेही मी लाजून खाली बघितले
मी मला या दर्पणीही नाही पुरेसे बघितले

२५ केला जरा बाजूस पडदा वदनावरूनि मी तिचा
होता तरीही आत दुसरा एक लाजेचा तिचा
राहूच ना पडद्यात यांच्या गप्पा अशा काही असो
पाहिजे यांनाच पडदा हा असो की तो असो

## लावण्य

२६ पाहिले लावण्य नुसते, नाही तिला मी पाहिले
पाहूनही चंद्रप्रभेला चंद्रास नाहि पाहिले
भेटूनिया ही भेट त्यांची नशिबात नव्हती आमच्या
हाय ! हे सौंदर्य त्यांचे आड आले आमच्या

२७ सौंदर्य वलयातून त्यांची दिसली जरा रेखाकृती
तेजातुनी अपुल्याच जैसी सौदामिनीची आकृती

ऐसे जरी ऐसे नव्हे नाहि तिला मी पाहिले
गेले दिपोनी नेत्र आम्ही मिटल्याच नेत्री पाहिले.

## कुंतल

२८ पेड वेणीचे तुझ्या तू सोडू नको मागे पुढे
आम्ही तरी कैसे पहावे सारखे मागे पुढे

२९ वेणी नव्हे तो केस आहे एक वेणीचा तुझ्या
सांग त्याला का नसावी ओढ गालाची तुझ्या

३० बोललो नाही कधी ना कधी बोलेनही
यातना मी काळजाच्या साहिल्या साहीनही
माझे असो या कुंतलांशी माझ्यापरी वागू नको
आपल्या गालावरोनी यांनातरी लोटू नको

३१ जे तुझे त्यांचीच सारी पाहून ऐशी दुर्दशा
वाटते काहीच नाही माझी स्वतःची दुर्दशा
इष्कातले अपमान आम्ही आता जरासे सोसले
जन्मभर या कुंतलांनी हेच आहे सोसले

३२ पेड वेणीचे नव्हे जे वक्षावरी तू सोडिले
रक्षिण्या धन यौवनाचे नाग सोडिले
जाणतो प्राणाहुनिही यांस तु सांभाळिसी
ना कळे आम्हांसही ही Dog in the Manger policy
(आता नुसता कल्पनाविलास बघा)

३३ पाऊलही दारी तुझ्या जाणून मी नाही दिले
जपलो तुझ्या नावास नाही बदनाम तुज होऊ दिले

स्वप्नातही माझ्या जरी का येतीस तू आधी मधी
स्वप्नही आम्ही कुणाला सांगितले नसते कधी

३४ वास्तवाच्या या जगी ना मीलनाची आस ही
सोडुनी तू स्वप्न माझे का इथे आलीस ही
वाटते की जीवनी या काहीच नाही राहिले
स्वप्नातही पण आज माझ्या काहीच नाही राहिले

३५ आजवरी नुसतेच होतो स्वप्नात तुजला भेटलो
हे खरे की आज ऐसे प्रत्यक्ष आहो भेटलो
हाय माझ्या दुर्दशेला अंत नाही राहिला
आज या प्रत्यक्षतेचा विश्वास नाही राहिला

३६ ऐसी जरी स्वप्नात माझ्या येऊनि गेलीस तू
मानेन की प्रत्यक्ष जेसी भेटुनि गेलीस तू
मानण्याचा प्रश्न नुसता ते स्वप्न अन् ही जागृती
काय मोठे त्यात आम्ही यालाच मानू जागृती

३७ येवूनही तेथे आम्हां ना भेटुनी गेलीस तू
ऐकतो स्वप्नात माझ्या येऊनी गेलीस तू
यातही उपकार आम्हां काही कमी ना वाटले
स्वप्नातही येशील ऐसे स्वप्नात नव्हते वाटले

३८ भीती तिला प्रणयात कोणी पाहील याची वाटते
येवूनही स्वप्न माझ्या हेच तिजला वाटते
म्हणते कशी कैसी तरी स्वप्नात या आले तुझ्या
सारेच पण आहेत बाई भोवती जागे तुझ्या

जाणते सर्वांस यांना मीही नव्हे साधी तशी
स्वप्नातही येतील मेले मी जशी आले तशी

३९ भेटण्या जेंव्हा तिच्या स्वप्नात मी गेलो तिथे
स्वप्नातही अपुल्या स्वतःच्या हाय ती नव्हती तिथे
त्रास ऐशा अप्सरेला हाच असतो सारखा
नेतो तिला उचलून जो तो अपुल्याच स्वप्नी सारखा

४० ऐकिले दुसऱ्या कुणाच्या स्वप्नात ती आहे तिथे
बोलाविले नव्हते तरीही धावुनि गेलो तिथे
आता तरी दुर्दैव वाटे नक्कीच माझे संपले
पोचण्या आधीच तेही स्वप्न सारे संपले

४१ चिंतनी त्यांच्याच होतो बागेत मी माझ्या इथे
ना कळे तीही कशी बागेत या आली इथे
होता जरी का हट्ट त्यांचा भेटू नये आम्हां कधी
चालला दैवापुढे का हट्ट कोणाचा कधी
आणिली जुळवून दैवे भेट त्यांची शेवटी
माझीच नेली बाग त्याने स्वप्नात त्यांच्या शेवटी

४२ बघता तिला तात्काळ मीही धावुनि गेलो पुढे
सांगेल का सांगा कुणी काय जे झाले पुढे
मीलनी होतो अशाही धुंदीत त्या तेंव्हा आम्ही
संपूत गेले स्वप्न याची पर्वा ही ना केली अम्ही

४३ ओशाळलो पाहून सारे लोक हसतांना अम्हां
तेंव्हा कुठे आली कळोनी चूक ही अमची अम्हां

होते जसे दुर्दैव माझे मागेच माझ्या लागले
प्रणयातही स्वप्नातल्या या बदनाम व्हावे लागले
दोस्तहो, तुम्ही तरी हा बोध घ्यायाला हवा
संपण्याआधीच स्वप्ने, प्रणय संपाया हवा

४४ आश्चर्य हे आश्चर्य याचे काही तिला ना वाटले
वाटले जे काय माझ्या ओशाळण्याचे वाटले
म्हणते कशी हे स्वप्न अपुले वाटे जरी का संपले
सांगते या प्रेक्षकांचे अद्याप नाही संपले
म्हणते पुन्हा ही जागृती जी वाटली तुजला खरी
वेड्या अरे ती जागृती ही स्वप्नातली आहे खरी

## नाजुकता

४५ नाजुकता ऐसी कुणी पाहिली नाही कधी
नजरही आम्ही तिच्यावर टाकली नाही कधी
भय अम्हां नाजुकतेचे हेच होते वाटले
भार ही नजरेतला या सोसेल नव्हते वाटले

४६ टाकिसी हळुवार अपुली नाजुक इतुकी पाऊले
टपकती हलकेच जैसे पारिजाताची फुले
नाजुकता जाणून आम्ही आधीच होती बिछविली
पायातली केंव्हाच तुझिया विकल हृदये आपुली

४७ इतुका तरी हा स्पर्श हृदया होईल होते वाटले
इतुके तरी सद्भाग्य उदया येईल होते वाटले

कल्पना नाजुकतेची आम्हांसही नव्हती कधी
गेली अम्हां तुडवून आम्हां कळलेच ना गेली कधी
(शृंगाराचा निरोप असा घ्यावा लागतो.)

४८ कुंतलांनो, अंचलांनो, द्या रजा घ्या शुक्रिया
वेगळचा विश्वात आता आहो निघालो जावया
मानतो आभार तुमचे, मानतो उपकार मी
निर्भत्सिण्या तुम्हांस, नाही साधु कुणी वा संत मी

४९ ऐसे नव्हे की आजही कंटाळलो तुम्हांस मी
सौंदर्य का विषयातले या केव्हा कुठे होते कमी
आज घटिका जीवनाची संपावयाला लागली
शुक्रिया, दारी कुणाची चाहूल येऊं लागली

* *

## जीवन

१ सोडिले ना घर कधीही गेलोच ना दुसऱ्या घरी
काळ पण आला असा मी पाहुणा घरच्या घरी

२ खूप होता गर्व मजला की नव्हे सामान्य मी
कल्पना विश्वात होतो, जैसा कुणी सम्राट मी
जुळविले पण हात जेंव्हा वास्तवाशी मी जरा
कळले मला माझ्याहुनी कोल्हा बरा, कुत्रा बरा

३ होता असाही काळ सारे नम्र होते मज पुढे
झेलण्याला शब्द माझा होते उभे मागेपुढे
आता कुठे तो काळ, त्याची खूण ही ना राहिली
आसवे माझी स्वत:च्या काबूत नाही राहिली

४ सारे मला विसरोत, त्याचे वाईट ना वाटे मला
वाटते वाईट, त्यांना विसरता ये ना मला
वाचला वेदांत आणि क्षणमात्र त्यांना विसरलो
दोस्तहो, दुसऱ्या क्षणी मी वेदांत सारा विसरलो

५ होती जरी अपमान आता जीवनी आधी मधी
साहतो हासून जैसे काहीच न झाले कधी
साधु परी या राग लोभा नसते अम्हीही सोडले
आम्हांसही नसते जरी का यौवनाने सोडले

६ आसवे इतुक्याच साठी नाही कधी मी गाळिली
गाळायची होती अशी की नसतील कोणी गाळिली

आसवांच्या या धानाला जाणून मी सांभाळिले
आज या वृद्धापकाळी, यांनी मला सांभाळिले

७ वाटले नव्हते कधी हा काळ आहे यायचा
संपेल हे उद्यान आणि आहे सहारा यायचा
याही स्थली रेतीत आम्ही फुलबाग आहे लाविली
इतुकेच की मी आज येथे नुसती अबोली लाविली

८ गंध ही आहे इथे, आहे अबोली ही जरी
आहे स्मृतींचा गंध येथे यांना जरी नसला तरी
रिझविण्या आम्हां इथेही आहेत कोणी सोबती
सोबती आहेत आसू, गतकाल आहे सोबती

९ आसू सवे या आज मी ही बागेत माझ्या विहरतो
होऊनिया जलभार जैसा मेघ व्योमी विहरतो
शास्त्रातही जो स्पष्ट इतुका नाही कुठे सांगितला
अर्थ साऱ्या जीवनाचा, यांनी मला सांगितला

१० जीवनांती आज हे ही नसते जरी का शेवटी
विझविण्या शोकानला या, कोण होते शेवटी ?
येऊनि नयनात जैसे गालावरी हे उतरले
करूणाहानाचे दूत वाटे सांत्वनाला उतरले ।।२।।
वाटले कोण्या ऋषींची साथ आहे भेटली
वाटले की माय जैसी लेकराला भेटली ।।३।।
जीवनाचे सत्य काही बघण्यास जर कोणा हवे
दोस्तहो, ते पाहण्यास डोळे नको आसू हवे ।।४।।

१ १ आसूतुनी जेंव्हा अता या विश्वाकडे मी पाहिले
आजवरी नुसतेच वाटे स्वप्न आम्ही पाहिले
तेच सारे विश्व, नाही लेश कोठे बदलला
बदलला जो काय त्याचा, अर्थ सारा बदलला

१२ याच त्या अर्थास म्हणती सत्य सारी दर्शने
झाले कुणी जे मुक्त झाले फक्त याच्या दर्शने
हासू नको पाहून माझ्या आसवे डोळ्यात ही
सांगतो, ऐसे रडाया खूप पुण्याई हवी

१३ तैसाच आहे शांत मी ही या आसवांच्या अर्णवी
शेषावरी श्रीकृष्ण जैसा झोपला क्षीरार्णवी
काय माझ्या आसवांनी आज मज नाही दिले
ते दिले जे ईश्वराने योग्यासही नाही दिले
(आमच्या अनमोल अश्रूपुढे आम्हांला स्वर्गही तुच्छ वाटतो.)

१४ स्वर्गातही जाऊन आता काय मज मिळवायचे
मिळविले सारेच येथे, स्वर्गात जे मिळवायचे ॥१॥
इंद्रा अरे सांगू नको त्या मेनका अन् उर्वशा
कोणा हव्या विसळून तुमच्या या चहाच्या कपबशा॥२॥
कल्पवृक्षाची तुझ्या या, ना अम्हां मातब्बरी
अमुच्या अरे या कुंपणाची त्याहुनी मेंदी बरी ॥३॥
त्यांनाच ने स्वर्गात ज्यांनी त्रास येथे भोगला
राहून नुसत्या संयमाने, वनवास येथे भोगला ॥४॥
आम्हां कशाला स्वर्ग आम्हां काहीच ना येथे कमी
आहे जरा जास्तीच येथे, स्वर्गात जे आहे कमी ॥५॥

आसवे आहेत येथे, दर्द ही आहे इथे
प्राण माझ्या जीवनाचा विकसतो आहे इथे ।।६।।
हे हवे आम्हांस, आम्ही स्वर्ग याला मानतो
साफल्य साऱ्या जीवनाचे, आसूत आम्ही मानतो ।।७।।

१५ फेडून घे अर्मान दैवा मागे पुढे पाहू नको
नाही कधी म्हणणार मी ही, आता पुरे, आता नको
भोगिले आहे अम्हीही, भोगावया जे पाहिजे
जीवनी आता अम्हांही, चेंज थोडी पाहिजे

१६ पाहिले ऐश्वर्य ते ही, आहे तुम्ही जे पाहिले
पाहिले जास्तीच आम्ही बरबादीचेही पाहिले
राखेतली या धुन्द आहे फक्त दोघा समजली
समजली आम्हांस आणि शंकराला समजली

१७ भंगल्या मूर्ति तयांचे भाव नाही भंगले
भंगले मंदीर, त्याचे शिल्प नाही भंगले
जीवनी बरबादीला ही झेलुनिया येथे अम्ही
आहो उभे तैसेच, जैसी वेरूळची लेणी अम्ही

१८ रडविले देवादिका तू, ऐकली कीर्ती तुझी
रडविण्या आम्हांस दैवा माय ना व्याली तुझी
जेंव्हा कधी नयनात तू या अश्रूस होते निर्मिले
प्रत्युत्तरी तात्काळ मी ही शेर काही निर्मिले

१९ याच शेरांनी जगाची उत्स्फूर्त वाहवा घेतली
दीनता नव्हती कुठे, नाही अरेरे घेतली

नुसतीच ना अपुली व्यथा, शेरात मी सांगितली
वाटले जैसी नव्याने गीता कुणी सांगितली

(जीवनाचे संगीत असे असावे)

२० अजवरी बेधुंद जैसा मांड आम्ही गाईला
त्याच त्या तल्लीनतेने, जोगिया ही गाईला
जाणतो इतुकेच, आम्हां मस्तीत आहे गायचे
दोस्तहो, हे दैव जाणे काय केंव्हा गायचे

२१ येतो असाही काळ केंव्हा काही असेही गायचा
जोगिया डोक्यात आणि मांड असतो गायचा
कौशल्य माझ्या गायनाचे कळलेच ना कोणा कधी
गेलो असा गाऊन नाही बेसूर ही झालो कधी

(जीवनाचा निरोप घेताना आम्ही परमेश्वराला सांगतो)

२२ आलो तुझ्या दुनियेत नव्हतो चोर वा डाकू अम्ही
एकही ना चीज इथली घेउनि गेलो अम्ही
तेही असो अमुच्या सवे आणिला ज्याला इथे
भगवन् अरे तो देह ही मी टाकूनी गेलो इथे

२३ नुसतेच ना दुनियेत तुमच्या, आलो अम्ही गेलो अम्ही
भगवन् तुझ्या दुनियेस काही देऊनी गेलो अम्ही
शायरी अर्पून गेलो, माझे जणु सर्वस्व ती
दुनिया तुला विसरेल भगवन् ना अम्हां विसरेल ती

* *

## विनोद

१ चंद्रमा हासे नभी शांत शीतल चांदणे
आमुच्या आहे कपाळी अमृतांजन लावणे
लावण्या हेही कपाळी नसतो तसा नाराज मी
आहे परी नशिबात हे ही अपुल्याच हाती लावणे

२ गेलो फिराया दूर तेथे खूप आम्ही बोललो
टाळुनि बोलायचे ते सर्व काही बोललो ॥१॥
कोणी अम्हां ना पाहिले आम्ही कुणा ना पाहिले
ओशाळलो ऐसे जसे की साऱ्या जगाने पाहिले ॥२॥
दोघेच होतो, शक्य नव्हते येणे तिथे तिसरे कुणी
लाजवीला मी शिवाजी गेलो तसे आलो अम्ही ॥३॥

३ पत्रे तिला प्रणयात आम्ही खूप होती धाडली
धाडिली होती अशी की नसतील कोणी धाडिली
धाडिली मजला तिनेही काय मी सांगू तिचे
सर्व ती माझीच होती एकही नव्हते तिचे

४ पत्रात त्या जेव्हा तिचेही पत्र हाती लागले
वाटले जैसे कुणाचे गाल हाती लागले
पत्रातही त्या हाय ! तेथे काय ती लिहते बघा
माकडा आरशात अपुला चेहरा थोडा बघा

५ सार्थता संबोधनाची आज ही कळली मला
वैय्यर्थता या यौवनाची ती ही अता कळली मला

नाही तरीही धीर आम्ही सोडला काही कुठे
ऐसे नव्हे की माकडाला माकडी नसते कुठे

६ वाटले विरहात माझ्या आसवे गाळील ती
वाटले, चिठ्ठी तरी काही मला धाडील ती
म्हणते कशी सौंदर्य विरही तेंव्हाच मजला समजले
आहे अशी विरहात मी, हे लोकास जेंव्हा समजले

७ पत्ता जसा विरह व्यथेचा माझ्या, जगाला लागला
जो तो मला येऊन अगदी त्याचीच मानू लागला
प्रतिसाद मी त्या सुजानतेला तैसीच देऊ लागले
जो जो कुणी भेटेल त्याला तूच मानू लागले

८ विसरा गुलाबी गाल, विसरा कुंतलांची विपुलता
अंचलाने स्पष्ट होते अंचलाची विफलता
ठेवुनी जाणीव याची प्रत्येक आहे नेसली
नाही अरे, इतुक्याचसाठी नऊवार कोणी नेसली

९ ऐसे जरी, समजू नका आहे निराशा व्हायची
ऐसे नव्हे अगदीच काही सोय नाही व्हायची
समजा जरी का वाटले कोणा कमी काही कुठे
ऐसे नव्हे, तो पार्ट याचा मिळणारही नाही कुठे

१० केसास देतो वेव्हज् आम्ही फेस पावडर लावतो
घालतो बुशकोट जैसा ब्लाऊज आम्ही घालतो
मर्दपण आम्हां म्हणाया शंका नका आणू कधी
सांगतो, शपथेवरी बाळंत ना झालो कधी

११ मजनू, अरे थोडा अम्हां का भेटला असतास तू
एकही आसू खरोखर गाळला नसतास तू
एक नाही लाख लैला मिळविल्या असत्या अम्ही
मिळविल्या नुसत्याच नसत्या वाटल्या असत्या अम्ही

१२ उन्मेष माझ्या यौवनाचा, काहीच ना झाला कमी
फक्त बघतो एक जागी दर्पणी वार्धक्य मी
बिंब ते प्रतिबिंब नोहे शास्त्र संमत हे जरी
मी तरी घेऊ कशाला, वार्धक्य ते माझ्यावरी

१३ दर्पणी वार्धक्य माझे ना पाहतो ऐसे नव्हे
समजावितो अपणा तरीपी, जाऊद्या तो मी नव्हे
प्रहसनी तो मी नव्हेच्या सर्वांस जो की फसवितो
काय त्या काजीत येथे जो तो स्वत:ला फसवितो

१४ ऐसे नव्हे की प्रहसनी त्या फक्त काजी जन्मला
काजी विना दुनियेत साऱ्या कोणीच नाही जन्मला
मंचावरी काजीस जेंव्हा कौतुके मी पाहतो
हासतो गालात वाटे काजीस काजी पाहतो

१५ दोस्तहो, दुनियेस धोका मेलो तरी आम्ही दिला
येवूनही नरकात पत्ता कैलासचा आम्ही दिला
हाय, हे वास्तव्य माझे, सर्वांस कळले शेवटी
सारेच हे सन्मित्र माझे येथेच आले शेवटी

१६ बोललो पाहून त्यांना येथे कसे आला तुम्ही
होता तुम्ही सद्‌वृत्त, ऐसे अमच्यापरी नव्हता तुम्ही

बोलले जैसे जगाला तू कुशलतेने फसविले
आम्ही अरे तैसेच अमुच्या साधेपणानें फसविले

१७ मृत्यूची माझ्या वदंता सर्वत्र जेंव्हा पसरली
घबराट इतुकी नरकलोकी केंव्हाच नव्हती पसरली
प्रार्थिती देवास, म्हणती सारे अम्हांला वाचवा
वाचवा आम्हांस आणि, पावित्र्य इथले वाचवा

१८ ऐसे नव्हे की बेवकूफी माझी मला ना समजली
समजली प्रत्येक वेळी थोडी उशीरा समजली
ऐसे जरी ही बेवकूफी सम्मानितो आम्ही तरी
काय या जगण्यात होते हीच जर नसती तरी

१९ शब्दही या पौरूषाचा बोललो नाही कधी
जगलो असा गुपचाप जैसा जन्मलो नाही कधी
दीर्घायुष्याचे मर्म माझ्या समजणे सोपे नव्हे
मृत्यूसही वाटेल याला हातही लावू नये

२० वाटे धरू सन्मार्ग आता काळ थोडा राहिला
वाटे कशाला व्यर्थ आता काळ थोडा राहिला
आहे जरी नक्कीच ठरले व्हायचे नापास मी
मिळवूनियाही काय आता हस्ताक्षराचे मार्क मी

२१ मानतो शास्त्रे पुराणे भोळा नका समजू मला
श्रद्धा नव्हे नुसतीच येथे आहे पुरावा चांगला
सांगती सत्शील मरती अल्पायुषी ते बापुडे
शास्त्र सत्याचा पुरावा हा मी उभा तुमच्या पुढे

२२ म्हणती मला शाबास, साऱ्या विषयांस तुम्ही सोडले
मी तरी सांगू कशाला कोणी कुणाला सोडले
ओळखी या संयमाशी माझी तरी नव्हती कधी
दोस्तहो, कीर्ति अशी फुकटातही येते कधी

२३ जातो तिथे उपदेश आम्हां सांगतो कोणीतरी
कीर्तनें सारीकडे चोहीकडे ज्ञानेश्वरी
काळजी अमुच्या हिताची येवढी वाहू नका
जाऊ सुखे नरकात आम्ही, तेथे तरी येऊ नका

२४ गेलो जरा स्वर्गात बघण्या काय आहे ते खरे
ऐकिले जे काय आम्ही सारेच ते नव्हते खरे
ऐसे नव्हे अप्सरा स्वर्गात नसते एकही
इन्द्राघरी असतात साऱ्या बाहेर नसते एकही

२५ आणखी सांगू पुढे मी काय तेथे पाहिले
कल्पवृक्षाच्या तळीही दीन दुबळे पाहिले ।।१।।
झाला जरासा भास, वाटे पाहून मजला हासले
नुसताच होता भास, नव्हते जन्मातही ते हासले ।।२।।
होते जरासे अंग त्यांनी वस्त्रात अपुल्या झाकले
इतुकेच की झाकावयाचे तेच नव्हते झाकले ।।३।।
स्वर्गही वैराण करण्या एकत्र ते होते तिथे
दोस्त हो, इथलेच सारे सर्वोदयी होते तिथे ।।४।।
आनंदलो क्षणमात्र तेथे पाहुनी काही स्त्रिया
काय सांगू कर्म, होत्या त्याही म्हणे साध्वी स्त्रिया ।।५।।

वंचना झालीच नव्हती माझी अशी जन्मातही
एकीकडे साध्वी स्त्रिया, एकीकडे सर्वोदयी ॥६॥
पुण्यक्षयावाचून नाही स्वर्गातुनी सुटका तिथे
हाय ! या पुण्यक्षयाचा मार्गही नाही तिथे ॥७॥
प्रार्थुनी देवास पुसले काय मी सांगा करू
स्वर्गातुनी सुटण्यास येथे पापे तरी कुठली करू ॥८॥
अप्सरा तुमच्या महाली, बाहेर या असल्या स्त्रिया
तूही तरी देवा, अरे, म्हणशील का यांना स्त्रिया ॥९॥
ओशाळला ऐकून त्याने अंती अम्हां मुक्ति दिली
मुक्ति दिली फुकटात, नाही अप्सरा कोणी दिली॥१०॥

२६ आलो घरी परतून सांगा होऊ कशाला मुक्त मी
ऐसे नव्हे आम्हांस तैसे काही घरी होते कमी
उघडेच होते दार नव्हते चिन्हही कोठे तिचे
ऐकले दुसऱ्या कुणाशी लग्नही झाले तिचे

२७ लागला धक्का तिचा जोरात पण होता मऊ
ती म्हणे सॉरी मला, मी म्हणालो 'थँक यू'

२८ तिरप्या तिच्या नजरेवरी बेहद्द झालो खूष मी
आज पण कळले मला ती ऐसीच बघते नेहमी

* *

## मृत्यू

१ ऐसे नव्हे मृत्यूस आम्ही केंव्हाच नाही पाहिले
खूप आहे पाहिले त्या प्रत्येक जन्मी पाहिले
मारीले आहे अम्हीही मृत्यूस या प्रत्येकदा
नुसतेच ना मेलो अम्ही, जन्मलो प्रत्येकदा

२ जन्मलो तेंव्हाच होते लग्न अमुचे लागले
बघितले पोते तिने मज, मीच नव्हते बघितले
समय माझ्या मीलनाचा होती उभी मोजीत ती
आज भेटे मौत आम्हां जैसी शिवाला पार्वती

३ मृत्यो, अरे येतास जर का होऊनि साकार तू
सांगितले असते तुलाही कोण मी अन् कोण तू
तुजसवे लढण्यात काही शान असती वाटली
घरच्याघरी मरण्यात ऐसी लाज नसती वाटली

४ हे खरे की तूच असते अंती अम्हांला मारिले
काय मोठे त्यात, आहे देवादिका तू मारिले
नसता जराही खेद, असतो ऐसे जरी मेलो तरी
लाभता बहुमान स्वर्गी वीरचक्राचा तरी

५ कंठतो आयुष्य नुसत्या आशेत या आता तुझ्या
येतो मनाला धीर नुसत्या कल्पनेने ही तुझ्या
आहे जसा की ध्यास तुमचा आता जिवाला लागला
हाय, पण दारी तुझ्याही, केवढा 'क्यू' लागला

६ मृत्यो, अरे तू का कुणाला येऊ नयेसा वाटतो
येतो असाही काळ जेंव्हा तूच यावा वाटतो
असते जरी काळी अशा तू ही कुणा सम्मानिले
देवा हुनीही जास्त असते, आम्ही तुला सम्मानिले

७ बांधला गाऱ्यावरी रेडा तसा हा आज मी
चघळीत आता स्वस्थ बसलो नुसत्या स्मृतींचा घास मी
मृत्युची थोडी कुठोनी चाहूलही येता मला
वाटे जसा की तोच आला धीर द्यायाला मला

८ मृत्यो, अरे आताच जर ना न्यावया येशील तू
आसवांच्या या प्रवाही वाहुनी जाशील तू
मृत्यो, अरे मृत्यूपथे तूही असा गेला अशा
द्यावी कुणाला हाक आम्ही वृद्धापकाली या अशा

९ मृत्यो, अरे आलास जर का क्षीण मी होता असा
म्हणवेल का तेंव्हा मलाही साधे तुम्हांला या बसा
ज्याच्या सवे अज्ञात देशी जावयाचे शेवटी
शोभेल का त्याशीच ऐसे वागून आम्हां शेवटी

१० ये अरे आताच मृत्यो, कुठवरी सांगू तुला
प्रेत का नुसतेच माझे न्यायचे आहे तुला
थोडा जरी का वेळ आता यापुढे घेशील तू
जातील माझे प्राण आणि, येणारही नाहीस तू

११ मृत्यू, अरे येतास जर का थोडा असा आधी तरी
ऐकुनी जातास तूही शेर एखादा तरी

एकही नही कला तू मानवांची पाहिली
जेथे जिथे गेलास त्यांची मातीच नुसती पाहिली

१२ ओळखी नव्हती तरीही भेटावया आले मला
खांद्यावरी अपल्या स्वतःच्या वाहुनि नेले मला
ना कळे की पूर्व जन्मी काय मी त्यांना दिले
इतके खरे मी आज त्यांना 'थँक्स' ही नाही दिले

१३ जन्मातही नव्हते कधी मी तोंड माझे लपविले
मेल्यावरी संपूर्ण त्यांनी वस्त्रात मजला झाकले
आला असा संताप मजला काहीच पण करता नये
होती अम्हां जाणीव की मी मेलो अता बोलू नये

१४ कफन माझे दूर करूनी पाहिले मी बाजूला
एकही आसू कुणाच्या डोळ्यात ना मी पाहिला
बघुनि हे माझेच आसू धावले गालावरी
जन्मभर हासूनही मी रडलो असा मेल्यावरी

१५ सूडही याचा तसा नाही कमी मी घेतला
जन्म ही पुढचाच माझा अजमीरला मी घेतला
एकही रडल्याविना ना राहिला तेथे कुणी
इतकेच की तेथे तसा फुकटात ना रडला कुणी

१६ मरता अम्ही शोकार्णवी बुडतील सारे वाटले
श्रद्धांजली तर जागजागी देतील होते वाटले
थोडे जरी का दुःख माझे, असते कुणाला वाटले
जळण्यातही सरणात मजला काहीच नसते वाटले

१७ ऐसे जरी संतोष तेंव्हा मानिला इतुकाच मी
कळलेच ना तेंव्हा कुणा कफनात जे रडलो अम्ही
त्यांचेच हे उपकार, ज्यांनी झाकले होते मला
झाकती प्रेतास का ते तेंव्हा कुठे कळले मला

१८ लाभला एकान्त जेंव्हा सरणात त्या माझ्या मला
रोखता आलाच नाही पूर अश्रुंचा मला
जेंव्हा चिताही आसवांनी माझी विझाया लागली
चिंता कसा जळणार आता याचीच वाटू लागली

१९ सरणातुनि नक्कीच तेंव्हा बाहेरही येतो असा
ना जरी बघतो तमाशा प्रेतयात्रेचा असा ॥१॥
बोललो अपल्या स्वत:शी केंव्हा तुला समजायचे
स्वजनात का, वेड्या अशा या परतून असते यायचे
॥२॥
आनंद का बघता तुला आहे कुणाला व्हायचा
झाला कुणाला शोक जो की शांत आहे व्हायचा ॥३॥
जळलो सुखे हा मोह जेंव्हा उरलाच ना काही कुठे
सरणावरी इतक्या सुखाने कोणीच ना जळला कुठे
॥४॥

२० आपुल्या मागे असा मृत्यू जरी ना लागता
आपणा अपुल्याच हाती फास घ्यावा लागता
पापे जरी हातून माझ्या वाटेल ती घडली तरी
नाही कधी घडणार नक्की आत्महत्येचे तरी

२१ एकदा मेल्यावरी मी परतुनी आलो घरी
तेच होते दार आणि तीच होती ओसरी ॥१॥

होती तिथे तसबीर माझी भिंतीवरी त्या टांगली
खूप होती धूळ आणि कसर होती लागली ।।२।।
द्रवलो तिला पाहून, होती शेवटी माझीच ती
दिसली मला पण आज माझ्या प्रेताहुनी निस्तेज ती।।३।।
बोलली की हीच का माझ्यावरी माया तुझी
गेलास ना टाकून, होती प्रत्यक्ष जी छाया तुझी
बोलली हेही तुला का सांगावयाला लागते
मेल्यावरी जगण्यास वेड्या खूप कीर्ती लागते ।।५।।
होऊनि स्वार्थांध नुसता कैसा तरी जगलास तू
आहेस का केला कुठे जगण्याविना पुरुषार्थ तू ।।६।।
समजली आता तरीना अपुली स्वतःची पायरी
समजले ना काय मिळते नुसती करोनी शायरी ।।७।।
ओशाळलो ऐकून नेली तसबीर मी ती उचलुनी
सांगतो याची तिथे चर्चाही ना केली कुणी ।।८।।

* *

# दार्शनिक

१ यौवनाचे पुष्प ताजे वाहिले विषयास मी
आलो प्रभो, तुज वाहण्याला त्याचे अता निर्माल्य मी
कित्येकदा येते मनी हेही तुला वाहू नये
वाटते तुमची अशी थट्टा तरी होऊ नये

२ भगवन्, तुला जर हाय जैसे नाव असते लाभले
आम्हांसही कोटी जपाचे पुण्य असते लाभले
पाहून हा जपयज्ञ तुजला संतोष असता लाभला
आम्हांसही रडण्यात नुसता मोक्ष असता लाभला

३ ना भितो मृत्यूस तैसा जैसा भितो मोक्षास मी
समजा तिथे कंटाळलो काय मग करणार मी
सांगती त्या रूक्षतेला अन्तही नाही तिथे
सांगती ज्ञाते पुन्हा मरणही नाही तिथे

(मानवाला काळजाची देणगी मिळाल्यामुळेच तो सौंदर्योपासना आणि सौंदर्य निर्मिती करू शकला ; पण अखेर याचे फल काय ?)

४ भगवन्, अरे नुसतेच कुठे तू काळीज अमुचे निर्मिले
आहे तुझ्या दुनियेत साऱ्या सौंदर्य आम्ही निर्मिले।।१।।
ना तरी नुसतेच असते पाषाण हे सारीकडे
श्वापदे असतो आम्ही असतो जसे मुंग्या किडे ।।२।।
नुसतेच ना सौंदर्य तुमच्या दुनियेत आम्ही ओतले
मानुनी सर्वस्व याला प्राण येथे ओतले ।।३।।

बदला परी याचा प्रभो, काय तू अम्हां दिला
आम्ही दिले सौंदर्य आणि नर्क तू आम्हां दिला ॥४॥

५ काय हे सौंदर्य सारे विषयात त्या नाही तिथे
सौंदर्य जर का रूप तुमचे काय तू नाही तिथे
का म्हणू की फक्त आम्ही विषयास या सम्मानिले
सम्मानिता विषयास आम्ही आहे तुला सम्मानिले

६ आरोपिता ऐसे जरी ओशाळला नसतास तू
लपलासही नसतास ऐसा निर्गुणाच्या आड तू
केली क्षमा आम्हीच आम्हां हे ही करावे लागते
करण्या क्षमा दुसऱ्यास भगवन्, माणूस व्हावे लागते

७ सांगसी निष्काम कर्मा, कृष्णा अरे वेदान्त तू
समजला की काय आम्हां किर्लोस्करांचा पंप तू ॥१॥
मोक्ष हा पुरुषार्थ ऐसे सांगसी जेथे तिथे
तू तरी देवा कधी आहेस का गेला तिथे ॥२॥
भोगिसी ऐश्वर्य सारे वंदिती इच्छा तुझी
संन्यास पण साऱ्या जगाने घ्यावा अशी इच्छा तुझी ॥३॥
निष्कामता थोडी जरी अंतरी असती तुझ्या
धावुनी साऱ्याच येत्या अमच्याकडे गोपी तुझ्या ॥४॥
केली जराशी दिल्लगी मानू नको विपरीत हे
जाणतो मीही प्रभो काही तुझे खोटे नव्हे ॥५॥
लाभण्या सामर्थ्य तुमचे आशा तरी कैसी करू
दिल्लगी ही ना करू तर काय मग दुसरे करू ॥६॥

८ तुमचाच आहे अंश भगवन्, मीही कुणी दुसरा नव्हे
लोळण्या पायी तुझ्या तुमचा कुणी कुत्रा नव्हे
हे खरे की आज माझे प्रारब्ध आहे वेगळे
ना तरी अपणात भगवन् काय होते वेगळे

९ भगवन्, अरे भेटूनिया ही काय मज देशील तू
मंत्र्यापरी येशील थोडा हासुनी जाशील तू
प्रारब्ध जर अमुचे अम्हांला आहेच हे भोगायचे
मी तरी सांगा कशाला कुंकू तुझे लावायचे

१० जेंव्हा कधी अमुच्यापरी देहात या आलास तू
झालास तूही दीन आणि ऐसाच हा रडलास तू
थोडा जरी का काल हाही विसरला नसतास तू
सांगतो आम्हांसही पण विसरला नसतास तू

११ केंव्हातरी प्रारब्ध माझे संपूर्ण हे भोगून मी
संपदा ऐश्वर्य माझे सारे पुन्हा मिळवीन मी
शब्दही या दीनतेचा जन्मात ना बोलू कधी
ऐसे नव्हे की काळ हाही संपायचा नाही कधी

१२ जाणतो हे व्यर्थ आहे माझे तुझ्याशी बोलणे
विसरेल जो स्वजनास सांगा काय त्यासी बोलणे
पायही दारी तुझ्या नसता कधी मी ठेविला
हाय, या संतांवरी मी विश्वास होता ठेविला

१३ पाहतो साऱ्या जगा ऐसे नव्हे ना पाहतो
पाहतो तैसेच जैसे पाहतो ना पाहतो

एकही संवेदना या अंतरी ना राहिली
नुसतीच आहे लेन्स आता फिल्म नाही राहिली

१४ जीवनाची रेलगाडी ना कळे नेते कुठे
तिकिटावरी तर स्टेशनाचे नावही नाही कुठे ॥१॥

फुकटात ना येथे अम्हां आहे कुणी येऊ दिले
दाम साऱ्या सुकृताचे मोजुनी आम्ही दिले ॥२॥

गोष्टी तशा तर खूप आम्ही एकमेका सांगतो
जायचे कोणा कुठे कोणी कुणा ना सांगतो ॥३॥

आहे कुणी टी. सी. परी हे ना कुणा समजायचे
एकटा तो फक्त जाणे कोणा कुठे उतरायचे ॥४॥

फेकतो वाटेल त्याला उचलुनि खिडकीतुनी
सांगती की खूप त्याची सवय आहे ही जुनी ॥५॥

फेकण्या मजला जसा तो सरसावला थोडा पुढे
देहात्मतेचा कोट नुसता मी फेकला त्याच्या पुढे ॥६॥

उचलुनी तो कोट त्याने फेकला खिडकीतुनी
केला मला आदाब आणि अदृश्य झाला लाजुनी ॥७॥

रेलही अदृश्य झाली काही असेही वाचले
तिकिटावरी मी शब्द आता निर्वाण इतुके वाचले ॥८॥

१५ मारतो राजास एक्का नहल्यास दहला मारतो
कल्पनेचे खेळ सारे कोणी कुणा न मारतो
पाहता कोणात काही नाही कुठेही वेगळे
सारेच तुकडे कागदाचे छाप नुसते वेगळे

१६ आता जरासा रंग काही खेळास येऊ लागला
पत्त्यातला राजा स्वतःला राजाच मानू लागला ॥१॥
राणीसही जाणीव काही और होऊ लागली
लाजली नव्हती कधी ती आज लाजू लागली ॥२॥
दीनतेचा खेद आता दुर्रीस होऊ लागला
पंजा म्हणे चौऱ्यास आता श्रीमंत वाटू लागला ॥३॥
विसरूनि निजरूप नुसत्या नामरूपी गुंतले
भलत्याच काही अवदसेच्या पाशात आता गुंतले ॥४॥
नुसता उपाधी भेद कोणी राजा नव्हे राणी नव्हे
आणखी सांगू पुढे हा खेळही अमुचा नव्हे ॥५॥
खेळतो दुसराच त्याला पाहिले नाही कुणी
म्हणती तयाला ईश, म्हणती अल्ला कुणी, येशू कुणी ॥६॥

त्याचा म्हणे हा खेळ नुसते पत्तें अम्ही पत्त्यातले
एका परी पत्त्यास कळले मर्म हे पत्त्यातले ॥७॥
आहे इथे रंगेल कोणी पत्ता असा पत्त्यातला
आहे जसा पत्त्यातला तो नाही तसा पत्त्यातला ॥८॥
नामरूपाचा स्वतःच्या पत्ताच ना त्याला कधी
नाही कशाची खंत होतो राजा कधी दुर्री कधी ॥९॥
हासतो नुसताच आहे सर्वाहुनी हा वेगळा
सांगाल का याहून कोणी वेदांत काही वेगळा ॥१०॥

१७ वाहवा ऐकून सारी आहात जी तुम्ही दिली
मानू अम्ही आहे पुरेशी तुमच्याही जिन्दादिली ॥१॥

समजू नका वाटेल त्याला आहे दिली जिन्दादिली
आहे प्रभूने फक्त काही भाग्यवंतांना दिली ॥२॥

हास्यही मी त्या प्रभूचे हास्यात तुमच्या मानतो
आशीर्वचे त्याची जशी या वाहवांना मानतो ॥३॥

ऐसे जरी येते मनी ही शायरी आता नको
खूप झाली बेवकूफी जास्ती तरी आता नको ॥४॥

आता परावाणीत आहे शायरी मज गायची
सांगाल का ही का अशी चौघात असते गायची ॥५॥

अजवरी शब्दातुनी जी वाहवीली शायरी
यापुढे वाहील नुसती नयनातुनी गालावरी ॥६॥

श्रोता अम्ही या शायरीचा, तोच आता समजतो
अर्थ जो या आज नुसत्या आसवांचा समजतो ॥७॥

तो प्रभू सर्वांतरात्मा आज मज श्रोता हवा
सांगतो त्याच्या मुखीही हीच घेऊ वाहवा ॥८॥

१८ शायरी नुसतीच नाही गायिली तुमच्या पुढे
आरसा आहे जसा की ठेविला तुमच्या पुढे
मोहुनी रूपास अपुल्या वाहवा तुम्ही दिली
ना अम्हां ना शायरीला तुमची तुम्हां, तुम्ही दिली

✠ ✠

१ जाहले कांहीतरी, जे व्हावयाला नको होते
एकटक माझ्याकडे तू बघायला नको होते ॥१॥
पूर्णबिंबा लाजवी, ऐसी मुखावर चारुता
लाजऱ्या डोळ्यांत होती, मृगशावकाची भीरुता ॥२॥
मिटविल्या ओष्ठद्वयी, होती करांगुलि रोविली
की न सांडो भूवरी, वाया सुधा अधरांतली ॥३॥
ऐसे तुला मी पाहिले, जे पाहण्याला नको होते
जीवनाची वेल माझ्या मी खुडाया नको होते ॥४॥
यौवनोद्धत ऊर उडवी रेशमी पदरा दुरी
सावरीता त्रासली होतीस त्या वरच्या वरी ॥५॥
गौरकायेची प्रभा नेसल्या वस्त्रांतुनी
शोभली जोत्स्ना शशीची विरल मेघा आडुनी ॥६॥
ऐसे तुला मी पाहिले जे पाहण्याला नको होते.
खेळ माझ्या काळजाशी मी कराया नको होते ॥७॥
सिंहापरी साहीन हा घाव मरणांतावरी
कळणार ही ना, कुणा झाले असे कांहीतरी ॥८॥
जाहले काहीतरी जे व्हावयाला नको होते ॥ धृ ॥

२ केव्हातरी बघुनी जराशी हांस बस इतुके पुरे
वाळलेल्या हिरवळीला चार शिंतोडे पुरे ।

३ अजवरी ना दाविल्या तुज अंतरीच्या भावना
संयमाने सोसल्या मी काळजाच्या यातना

आज आली मरणवेळा जायचे आहे मला
हाय ! माझ्या संयमाने शेवटी धोका दिला ।

४ जागलो कित्येक रात्री फक्त तुझिया चिंतनी
लाविले ना नेत्र पळही गीतेतला जणू संयमी
आजही मी जागतो इतुक्याचसाठी रात्र ही
भेट ना होवो तुझी-माझी आता स्वप्नातही ।

५ होते असे भलतेच कांही, इष्कातल्या जगती इथे
हृदयही तेथेच जुळते, नजराहि ना जुळती जिथे ।

६ रूप-यौवन-संपदेची गाऊं द्या काव्ये कुणी
गुंफिले मी काव्य एका ' हाय ' या शब्दातुनी

७ कुठवरी सोसावयाच्या यातना तुज पाहुनी
वाटते की ठीक होती चाल पड्याची जुनी !

८ कोणतेही एक आता, आहे मला विसरायचे
विसरायचे आहे तुला, किंवा मला विसरायचे
अभ्यासुनी ही दर्शने, मज काहीच नव्हते समजले
मानिती अद्वैत, का ते इष्कात मजला समजले !

९ ओळखीही ना दिली लैलास ते मजनू अम्ही
यातनासह जन्म गुजरू भीक ना मागू अम्ही !

१० गर्व रूपाचा जसा, तुम्हांस आहे आपुल्या
आम्हांसही तितुकांच आहे विकलतेचा आपुल्या

सौंदर्य माझ्या विकलतेचे आज जे मी बघितले
सांगतो नाही तसे तुमच्यातही ते बघितले!

११ दर्पणी का दर्पणाचे सौंदर्य कोणी पाहतो
पाहतो जे काय तेथे आपुल्या मुखाचे पाहतो
सौंदर्य ही तुमच्यात तुमचे जे काय आम्ही बघितले
तुमचे नव्हे ते सर्व आम्ही आमुच्या व्यथांचे बघितले !

१२ सांग मी मरणार कैसा नेत्रबाणांनी तुझ्या
जाणतो निःशंक, आहे संजीवनी अधरी तुझ्या

१३ पाहता, ओशाळुनी तू मान खाली घातली
बघवली नाही तुलाही आग तू जी लाविली
पेटती ती आग आम्ही जन्मभर सांभाळतो
प्रीतीच्या पंथात आम्ही अग्निपुजेला मानतो

१४ दोस्तहो हा इष्क काही ऐसा करावा लागतो
ऐसे नव्हे नुसताच येथे जीव द्यावा लागतो
वाटते, नागीण ज्याला खेळण्या साक्षात हवी
त्याने करावा इष्क येथे छाती हवी, मस्ती हवी

(इष्काची चव वार्धक्यातही रेंगाळत होते–)

१५ आत कुठे त्या मेनका, मी कोठून आणू ऊर्वशी
आज तर नाही उशाशी, फाटकी साधी उशी
सांगतो, नाही तरीही, इष्क काही संपला
संपला जो काय त्याचा, पूर्वार्ध नुसता संपला

१६ ना म्हणू इष्कातले या, सौंदर्य त्याला समजले
झाल्यावरी बर्बाद ज्याला, बरबाद झालो समजले
मद्यात ही सांगा नशा, मग काय आहे राहिली
झाल्यावरी बेहोष याची जाणीव जेथे राहिली

१७ त्याला कुठे का इष्क ऐसे आहे मिळाले नावही
नावासही ना हाय जेथे, ना आसवांचे नावही
आसूविना जो इष्क येतो, कोणासही तो भोगता
भोगता इंद्रास येतो, कुत्र्यास येतो भोगता

## लज्जा

१८ कुंतलांना सावराया हात मागे गुंतले
त्याच वेळी मजकडे जाणून त्याने बघितले
हासला निर्लज्ज वरुनी, मी लाजले रागावले
रागावले, मी ही अशी, की हासुनी रागावले

१९ बघितले नसते ही आम्ही ना अशी जर लाजती
निखळल्या पदरास आणि हातही ना लावती
बुद्धापरी होतो ऊगे ठायीच आम्ही आमुच्या
व्यर्थ आला अविनयाचा आळ माथी आमुच्या

२० झाली ऊगा गंभीर नव्हते बोलायचे कांही तिला
कांही करा पण आज अगदी लाजायचे नव्हते तिला
ऐसे जरी नाह्री तिलाही कळले, कशी ती लाजली
आज ती नुसतेच जेव्हा लाजावयाला लाजली

## शृंगार

२१ पेल्यातले प्या मद्य, पण ओठातले प्राशू नका
दुरुनिच याची ये नशा जवळी या जाऊ नका
स्पर्शणे तर दूर राहो, बघितले नुसते जरी
याची नशा, मी सांगतो, उतरते मेल्यावरी

२२ भिन्न मद्यांच्या चवी आम्ही क्रमाने चाखतो
पेल्यातली घेऊन आधी ओठातली मग चाखतो
वेगळी कॉकटेल, ऐसी एकत्र ना मिसळायची
सांगतो याची मजा चौघात नाही यायची

२३ कैसे म्हणू की नजर अपुली कोणावरी टाकू नको
इतकेच की पेल्यातल्या या मद्यावरी टाकू नको
बेहोश ना होऊ कितीही आम्ही जरी ही घेतली
सांगतो अद्याप आम्ही कॉकटेल नाही घेतली

२४ अपुल्याच दांती ओठ अपुला चावणे नाही बरे
हक्क अमुचा अमुच्या सामोरी मारणे नाही बरे

२५ घेतला तू वेळ जेव्हा सावराया अंचला
वाटले तेव्हाच द्यावे ' थँक्स ' येऊनिया तुला

२६ धस्स ना जर होतसे काळीज तू येता क्षणी
अपुल्या मधे, कोणात काही, नक्की जरा आहे कमी

२७ बेवफाईचा तिच्या आरक्त वदनी निलीमा
ऐसा खुले, की मोहुनी, मी तिला केली क्षमा

२८ नैसली जॉर्जेट काळे, गौर तनु झाकावया
आज वाटे अवस आली पौर्णिमा ग्रासावया
वस्त्रातुनी त्या अंगकांती तैसीच आता शोभते
यमुनाजळी गोपांगनांचे वैवस्त्र्य जैसे शोभते

२९ घेती जरा का वेळ थोडा सांवराया अंचला
मानिले असतेही आमुची पर्वा जरा आहे तिला

३० चालताना सारखी ती लचकून जेव्हा चालते
वाटते नागीण जैसी आता उभ्याने चालते

३१ जाणते ती लाख नुसत्या जीव घेण्याच्या तऱ्हा
सरळ आहे भांग आणि निष्पाप आहे चेहरा

३२ बघता तुम्हां ही, नजर तुमची भूतली जी लागते
सौदामिनी नेत्रातलीही 'अर्थ' व्हावी लागते

३३ मरती जिते पण प्रेतही हासते आनंदुनी
ना कळे डोळ्यात तुझिया संहार कां संजीवनी

३४ आहे अम्हां जाणीव अमुचा मृत्यू कुठे हा राहतो
आहे असा वस्ताद बेटा नयनांत त्यांच्या राहतो
आहे दया हृदयात त्यांच्या ईश्वरानेही दिली
आमुच्या नजरेस त्यांनी नजरही नाही दिली

त्यांनी आमच्यावर नजरेचा तीर मारला नाही तरीही आम्ही वाचत नाही.

३५ दोस्तहो आहो तरीही इष्कात या मेलो अम्ही
आज ना बघण्यात यांच्या ऐसे, आता मेलो अम्ही

मानु आम्ही, त्यांनी अम्हांला हासून नसते पाहृयचे
सांगा बरं ? आहे बर का ? अगदीच नाही पाहृयचे

३६ गेला तुम्ही सोडून त्याचे कांही अम्हां ना वाटले
व्हायचे इष्कात ऐसे आधीच होते वाटले
हृदयही पण हाय ! माझे बेईमान झाले शेवटी
गेले अम्हां सोडून तेही तुमच्याच मागे शेवटी

३७ विरहार्णवी आहे जरी का तुम्ही आम्हांला सोडिले
क्षण मात्रही नाही कधी तुमच्या स्मृतींनी सोडिले
माझ्यावरी हे प्रेम यांचे मी पाहिले नाही कुठे
धन्य या तुमच्या स्मृतिची ! या कुठे ? तुम्ही कुठे ?

३८ कुलशीलता तुमच्या स्मृतिची आधी जरी कळती मला
मोहही तुज भेटण्याचा नसता कधी झाला मला
लाजल्या नाही कुणीही यांच्यापरी कोणापुढे
मिटल्याविना मी नेत्र नाही याही कधि आल्या पुढे

३९ नसते कमी इष्कांत नुसत्या यांच्या स्मृती असल्या तरी
नसते कमी या अप्सरांचा पत्ता जरी नसता तरी
वाईट या इष्कांत आम्हां याचेच वाटू लागते
यांच्या स्मृती येण्यास यांची भेट व्हावी लागते

* *

# जीवन

१ मृत्युची छाया जशी, ही स्पष्ट होऊ लागली
तेव्हा कुठे या जीवनाची ओढ वाटू लागली
मध्यान्हिचीही सोय जेव्हा, एकही ना राहिली
तेव्हा कुठे चूर्णाविनाही भूक वाढू लागली

२ दोस्तहो, वार्धक्यही हे सह्य होऊ लागते
थोडी जरा निर्लज्जतेची साथ घ्यावी लागते
मूल्य या निर्लज्जतेला नक्कीच आहे जीवनी
आज या वृद्धापकाली ही खरी संजीवनी

३ जीवनांती खास तैसे, कांहीच नव्हते राहिले
होते जरा अपमान थोडे व्हावयाचे राहिले
ओळखीही दुर्दशेशी, व्हायची होती खरी
आता कुठे या जीवनाला, पूर्णता आली खरी

४ कोणीच ना माझे खरे सिद्धान्त हा खोटा नव्हे
सारेच माझे आप्त हेही आहे खरे, खोटे नव्हे
कोणीच ना माझे जसे हे समजावयाला लागते
सारेच माझे आप्त हे ही तेव्हा कळाया लागते

५ नाही जराही खेद, नाही कोणी जरी माझ्यासवे
आहेत माझ्या सोबतीला अनमोल माझी आसवे
प्रारब्धही पण नेहमीचे आहेच माझ्या सोबती
दोस्तहो, मरणातही या, काल आहे सोबती

६ आवेग माझ्या भावनांचे ना कळे गेले कुठे
ना कळे, की आज माझी आसवे गेली कुठे
हाय ! माझ्या जीवनी या, सारेच काही संपले
संपले केव्हाच हासू आज आसू संपले
आसवे पुसण्यास जेंव्हा कोणीच नाही राहिला
थेंबही या आसवांचा डोळ्यात नाही राहिला
हासतो गालात येता हेही कळोनी शेवटी
होते जसे माझे रडेही दुसऱ्याचसाठी शेवटी

७ हे खरे की जीवनी या बर्बाद झालो एकदा
वाटते वाईट, झालो बर्बाद नुसता एकदा
क्रूरता या दुर्दशेची, आज मज कळते खरी
बर्बादीची ही हौस माझ्या, हाय ना झाली पुरी

८ बर्बादिचा या आज आम्हां, ना खेदही ना खंतही
झाले उगा बर्बाद येथे सत्‌शील तैसे संतही
इतुका तरी संतोष आहे, आज हा आमच्या मनी
झालो स्वये बर्बाद आम्हां बर्बाद ना केले कुणी

९ जीवनी या फक्त आहे, आम्ही आम्हांला मारले
आम्ही अरे, जाणून, डोळे दुर्दशेला मारले
दोषही याचा कधी, नाही कुणा मी लावला
लावला जो काय नुसता हात भाळी लावला

१० वार शस्त्रांचे कसेही, येतील सारे सोसता
त्यालाच मानू शूर, ज्याला अपमान आले सोसता

मानतो प्रत्यक्ष लक्ष्मी, तेथेच आहे उतरली
वैभवाची ऐट ज्याच्या दैन्यातही ना उतरली

११ थोडे जरी हासून कोणी बोलले अमुच्या सवे
येतो भरोनी ऊर आणि येतात नयनी आसवे
ऐसे नव्हे, सौंदर्य ना मी, हास्यात आता पाहतो
आरंभ साऱ्या दुर्दशेचा येथेच आता पाहतो

१२ " बाजार माझ्या यातनांचा मांडला जाहीर मी
जोगिया गाऊं नये तो गाईला चौघात मी
दोस्तहो, सांगू खरे निर्लज्ज का झालो असा
वाटले, माझे असो, तुम्ही तरी थोडे हसा

१३ नाही तरी या दो दिसांचे पाहुणे येथे अम्ही
आज नाही, तर उद्या परवा तरी जाऊ अम्ही
जाणतो, येथे पुन्हा परतून नाही यायचे
द्या शिव्या, काही करा, काय अमुचे व्हायचे

१४ आजहि सारी स्मृती, येते अशी डोळ्यापुढे
बाहुली निर्जीव जैशी, नाचवी कोणी पुढे
आपुल्या निस्तेज नयनी जेंव्हा मला ती पाहते
पाहतो मी ही जसे, की प्रेत प्रेता पाहते

१५ समजू नका की, आसवे नयनातुनी या वाहतो
अस्तास माझ्या यौवनाच्या अर्घ्य आम्ही वाहतो
जाणतो हा सूर्य आता उगवायचा नाही पुन्हा
जीवनाची, वेल आता, बहरायची नाही पुन्हा

आता तमाशी गाठ आहे, येथून अमुची व्हायची
आता परीक्षा पौरुषाची येथेच आहे व्हायची
होती अम्हां जाणीव, त्याला सज्जही आहो अम्ही
राहण्या गाफील कोणी, नेहरु नाही अम्ही
या तमाची ना तमा, आम्ही असे साव नव्हे
आहो ऋषीचे पुत्र, कोणी रस्त्यातले कुत्रे नव्हे

१६ आरशातून एकटक मज कुणी पहात होते
नयनीच होता जीव बाकी सर्व कांही प्रेत होते
सांगती संतादिकांनी मरण त्यांचे पाहिले
दर्पणी आहे अम्हीही प्रेत अमुचे पाहिले

१७ खूप माझ्या आसवांनी साथ मज होती दिली
ऐसी दिली होती जशी, कोणी कुणाला ना दिली
हाय तेही आज मजला, सोडून गेले एकटे
वाटले नव्हते कधी, पण आज वाटे एकटे

१८ हे खरे की कंटाळलो या जीवना अगदी पुरा
मृत्युची तर कल्पनाही जीव करिते घाबरा
वाटते की आज मजला काहीतरी ऐसे हवे
ऐसे हवे कांही तरी जे जगणे नव्हे मरणे नव्हे

१९ मरत होते लाख मजवर होते अशी मी एकटी
लाखावरी मी आज मरते, हाय ! पण मी एकटी

२० हृत्कपाटा लाविली, मी आतुनी माझ्या कडी
स्वस्थ आता पीत बसलो सात नंबरची बिडी

२१ म्हटले कधी का मी प्रभो, की मला रडवू नका
फक्त माझी आसवे ही, इतरा कुणा दावू नका

२२ निर्भत्सिती या जीवना, ती दर्शने वाचू नका
कोणताही राग गा, पण 'जोगिया' गाऊ नका
संगीत अपुल्या जीवनाचे अंतावती गाऊ सुखे
मंद्रात मिळवू प्राण आणि ठेक्यात देऊ आंचके

२३ बेवफाई जाणुनी मी जीव तिजवर लाविला
जाणुनी प्रासाद माझा वाळूवरी मी बांधिला
इंद्र मी श्वानापरी धावलो मागे तिच्या
मागितले सारे दिले विश्वासुनी वचनी तिच्या
अमृताचे कुंभ मी लाथाडिले पायातळी
पायातळीच्या वाकुनी वेचिल्या पत्रावळी
सांगू खरे का, का म्हणोनी केला स्वतःचा नाश मी
बे-वफाईचीच होती जीवनी माझ्या कमी

२४ ऐसे नव्हे इष्कात अम्हां काही कमी होते घरी
हाय मी गेलो तरीही दीनापरी दुसऱ्या घरी
अर्थ का याचा कुणा पाहिजे सांगितला
आम्ही अरे गमतीत थोडा जोगवा मागितला

२५ सुरुवात साऱ्या दुर्दशेची येथून होऊ लागते
भिक्षा जशी झोळीत अपुल्या खूप येऊ लागते
वाटते आम्ही म्हणोनी लाभली भिक्षा अशी
कळते आता ही क्षुद्र भिक्षा कोणासही मिळते अशी

२६ भिक्षेत का सन्मान काही आहे कुणाचा राहिला
होता घरी जो काय तोही आता घरी ना राहिला
झाल्यावरी बर्बाद येते हेही कळोनी शेवटी
ऐश्वर्यही भिक्षेतले या भिक्षाच होते शेवटी

२७ केला असा जो इष्क त्याचा खेद आता वाटला
इष्क ना करतो तरीही इतकाच असता वाटला
खेदातही संतोष आम्ही मानला असता तरी
खेदही केल्या कृतीचा काही खरा असता तरी

२८ मी तरी ही आत्मनिंदा, का करावी एवढी
निर्भत्सिण्या आम्हांस सारी दुनियाच आहे येवढी
लाजलो नाही कितीही निंदीले यांनी तरी
लाजलो नक्कीच असतो कोणी कमी असता तरी

२९ रडताच ना आले अम्हां जन्मण्या आधी कधी
येईल का रडता पुन्हा मेल्यावरी आम्हां कधी ॥१॥
वाटले, की याचसाठी, जन्म घ्यावा एकदा
वाटले फेडून घ्यावी, हौस तीही एकदा ॥२॥
आरंभही मी जीवनाचा, रडण्यातुनी केला सुरू
अंतावरी राहील वाटे, कार्य हे माझे सुरू ॥३॥
आता जसा निःशंक रडण्या सरसावलो थोडा पुढे
आले स्वये भगवान, आणि टाकली गीता पुढे ॥४॥
याही जरी जन्मात आम्हां देईल ना कोणी रडू
मी तरी सांगा अता कोठे रडू, केव्हा रडू ॥५॥

बोललो रडलास तूही हरवता सीता तुझी
रडता अम्ही आम्हांपुढे टाकसी गीता तुझी ॥६॥
ओशाळला ऐकून आली सारी स्मृति त्याला पुनः
भगवानही मी काय सांगू, माझ्यापुढे रडला पुनः ॥७॥
आसवे त्याचीच पुसली, नयनातुनी आम्ही स्वये
प्रार्थुनी म्हणतो कसा 'सांगू नको कोणास हे' ॥८॥
बोललो की, 'व्यर्थ आहे सारी अशी शंका तुझी
राखायची आहे मलाही परमेश्वरा अब्रु तुझी ॥९॥
रडण्यातही सौंदर्य माझ्या ना जरी बघते कुणी
भगवन् अरे, ही शायरीही ऐकिली नसती कुणी ॥१०॥
तूच ना रडलास देवा, रडले मुनी रडले ऋषी
'तस्मादपरिहार्येर्थे न त्वं शोचितुमर्हसी' ॥११॥
जाणतो देवा अम्हीही रडण्यास या भ्यालास ते
क्लैब्यं मास्म गमःकृष्ण । नैतत् त्वै ऊपपद्यते ॥१२॥
चारुता हास्यांत तैसी रडण्यातही आहेच ती
मानतो इतक्याच साठी, 'धीरस्तत्र न मुह्यती ॥१३॥
सिद्धान्त ऐसा आसवांचा त्यालाच मी सांगितला
होता जसा युद्धात त्याने कुंती सुता सांगितला ॥१४॥
बोलला, 'साक्षात अविद्यानाथ आम्ही पाहिला
पार्थाहुनीही मूर्ख आम्ही अद्याप नव्हता पाहिला' ॥१५॥

* *

# विनोद

१ निर्दाळण्या दुष्टास, तुजला त्रास घ्यावा लागला
देह घ्यावा लागला, अवतार घ्यावा लागला
त्याहूनही दुर्वृत्त आम्ही त्रासविले ना तुला
मेलो असे चुपचाप की, हे माहीतही नाही तुला

२ मृत्युची माझ्या वदंता सर्वत्र जेव्हा पसरली
घबराट इतकी, नर्कलोकी केव्हाच नव्हती पसरली
प्रार्थिती देवास सारे म्हणती अम्हांला वाचवा
वाचवा आम्हांस आणि पावित्र्य इथले वाचवा

३ काहीच ना झाले कमी, मी काहीच ना केले तरी
घरच्या घरी वार्धक्य आले मरणही घरच्या घरी
खूप झाले श्राद्ध, होतो त्या तिथे अदृश्य मी
आनंदलो पाहून सारे, काहीच ना झाले कमी

४ अद्यापही मी नीलव्योमी, चंद्र नाही पाहिला
समजू नका सांगेन, तुम्हां, कोठे कसा मी पाहिला
ऐसे नव्हे, तुम्हांस काही सांगू नयेसे वाटते
तुमच्या अरे, संभावितीची शंका मनाला वाटते

५ चंद्रासवे राहून जेव्हा आलो अम्ही मसणावरी
आता म्हणे पाऊल यांनी टाकीले चंद्रावरी

६ जेव्हा तिचा मुखचंद्र आम्ही जवळून अगदी पाहिला
दुर्बिणी घेऊन वाटे, चंद्र जैसा पाहिला

चंद्रापरी ते डाग जेव्हा, गालावरी दिसले मला
सादृश्य ही उपमेतले त्या, तेव्हा कुठे पटले मला

७ ऐसे जरी समजू नका आहे निराशा व्हायची
ऐसे नव्हे अगदीच काही सोय नाही व्हायची
समजा जरी का वाटले कोणा कमी काही कुठे
ऐसे नव्हे तो पार्ट याचा मिळणारही नाही कुठे

८ पत्रात त्या जेव्हा तिचेही पत्र हाती लागले
वाटले जैसे कुणाचे, गाल हाती लागले
पत्रातही त्या हाय तेथे, काय ही लिहिते बघा
माकडा आरशांत आपुला, चेहरा थोडा बघा

९ दोस्तहो, ते पत्र आम्ही आजही सांभाळतो
रुक्मिणीचे पत्र जैसा, श्रीहरी सांभाळतो
येतो भरुनी ऊर आणि कंठ आता दाटतो
एकही ना शब्द तिथला, आज खोटा वाटतो

१० सार्थता संबोधनाची, आज ही कळली मला
वैय्यर्थता या यौवनाची, तीही आता कळली मला
नाही तरीही धीर आम्ही सोडला काही कुठे
ऐसे नव्हे की, माकडाला माकडी नसते कुठे

११ मजनू अरे, ऐसे नव्हे की तूच लैला पाहिली
पाहिली आहे आम्हीही, नुसतीच नाही पाहिली
आम्हांसही तुझिया परी, आहे रडावे लागले
इतकेच की आधी नव्हे, आता रडावे लागले

१२ मजनू अरे, भलताच काही, पंथ तू हा काढला
दोस्ता असा तू जन्म सारा, रडण्यात नुसता काढला
सौंदर्य तर आम्हांसही, कळते जरा रडण्यातले
रडण्यात तुझचिया नव्हे, लैलाचिया रडण्यातले

१३ आम्हांसही लैला कुणी, कोठे अशी असती जरी
दाविले असते आम्हीही, काय असते शायरी
दैन्य पण अमुचे असे, की मीच सारे व्हायचे
मीच मजनू व्हायचे, अन् मीच लैला व्हायचे

१४ भीड मज बाई कुणाची, मोडवत नाही कधी
सुचविता कोणी कसेही, नाहीच ना म्हणवे कधी
एकदा सांगून बघते, 'हे बघा ऐका जरा'
सांगते खुश्शाल मग मी 'काय वाट्टेल ते करा'

१५ ती म्हणाली, 'सांग कैसा विश्वास ठेवू तुजवरी ?
पाहिला आहे कुणी का लठ्ठ मजनू अजवरी ?'
मी म्हणालो, 'रोड मजनू यापुढे विसरा तुम्ही
म्हटले तरी आहात का हो, कोणासही नाही तुम्ही

१६ नेसले नायलॉन जे ते आहे कुणी का बघितले
विश्वासलो नाही, तिला मी हात लावून बघितले
कळता क्षणी ती थाप होती नुसती तिची नायलॉनची
सोडून माझी पँट मी ही नेसलो नायलॉनची

१७ म्हणते कशी ही वेषभूषा नाही तुम्हांला शोभली
वस्त्रे अशी नायलॉनची पुरुषास केव्हा शोभली

घेतली हिसकून त्यांनी पँट ती नायलॉनची
इतके बरे की आत होती दुसरी पुन्हा नायलॉनची

१८ ना भीते ती कुणाला तोच तिज आता भितो
आज हा मजनु स्वतःच्या विनयभंगाला भितो

१९ शिवत असते प्रेस–बटणे ब्लाउजची ती नेहमी
येता तिजला भेटावयाला वर्ग-बंधू नेहमी

२० येतो फिराया तुजसवे, ऐक जे सांगेन मी
नेसायचे नऊवार तू अन् मागे तुझ्या चालेन मी

२१ रोखू नको डोळे असे हे, सांगतो तुज एकदा
पाहिल्या आहेत आम्ही चंप्या अशा कित्येकदा

२२ वृद्ध मी, नाही जरी निवृत्त झालो फारसा
सोडिल्या मी दोन गोष्टी कंगवा अन् आरसा

२३ ऐकून माझा दर्द तेथे सारे म्हणाले वाहवा
बोलले की दर्द काही जो हवा ऐसा हवा
हाय! या काव्यास माझ्या दोघेच तेथे हासली
हासला मोत्या जरासा चंपी जराशी हासली !

२४ बोलले हासून तुमच्या शायरीची वाहवा
वाहवा जी यास देते त्या मैफिलीची वाहवा
आम्ही अरे नुसते जरासे एकमेका पाहिले
झाले पुढे जे काय आहे साऱ्या जगाने पाहिले !

२५ सावराया अंचलाते विसरल्या आहेत त्या
लाजून त्याचे टोक अधरी ना पुन्हा धरतील त्या
भावदृश्ये रम्य ऐसी विसरण्या आता हवे
आता म्हणे सर्वास यांना स्कर्ट नेसाया हवे !

२६ बदलत्या वेषांत सांगा कैसे तसे लाजायचे
स्कर्टात कां असते कुणी आता तसे लाजायचे
हे बरे की आज तैसे लाजले नाही कुणी
लावील का अधरास अपुल्या स्कर्टही आपुला कुणी

२७ येऊ नका अमच्याकडे आमच्याकडे पाहू नका
इतक्यावरीही याल तेव्हा मागे पुढे पाहू नका
अजवरी अब्रूस आमच्या जे काय मी सांभाळले
सांभाळले तुम्हीच ऐसे ना येवूनी सांभाळले

२८ होते तयाचा आज आम्हां भासही नुसता पुरे
ना मिळो ही मद्य नुसते टमरेलही आम्हां पुरे
लाभते प्रत्यक्ष जैसे थोडे कुठे दिसले तरी
चघळतो आमलेट नुसती टरफले दिसली तरी

२९ लाजायचे जे काय सारे पहिल्याच दिवशी लाजली
त्यापुढे प्रत्येक वेळी आमचीच स्वारी लाजली

३० चुंबने जोरात आम्ही नाही आताशे घेतली
वाटले घ्यावी तशी नाही तरीही घेतली
काळजी नाजूकतेची त्यांच्या तशी नव्हती मला
होती जरा माझ्याच खोटया दंतपंक्तींची मला

३१ निर्मिती नायलॉनची या ना जरी होती कधी
सांगतो आम्हां अभाग्या काहीच ना दिसते कधी
अजवरी देहावरी मी नुसत्याच साड्या पाहिल्या
ना म्हणू पण आज आम्ही नुसत्याच साड्या पाहिल्या

३२ काहीच ना केले तरीही होती जरा नाराज ती
वाटले इतुक्याच साठी होती जरा नाराज ती
बोललो की बात काही समजण्या आम्हां हवी
ती म्हणे पुसण्यास नुसते लाज वाटाया हवी
संतापलो ऐकून बाकी काही मला ना समजले
झाले पुढे जे काय आम्हां दोघासही ना समजले

३३ ओळखी नव्हती तरीही काहीच ना झाले कमी
गेलो पुढे नि:शंक, नव्हती तीही कुठे काही कमी
पर्वा कुणी का ओळखीची इष्कात या केली कधी
होते कधी आधिच, केव्हा मागूनही होते कधी

३४ आजही जेव्हा कुठे भेटते आधिमधी
संभाषणी याचा कशाचा उल्लेखही नसतो कधी
नाही मला ठाऊक तेव्हा काय तिजला वाटले
नाही तिलाही हौस कळण्या काय आम्हां वाटले

३५ ओळखी इष्कात ज्यांना वाटते आधी हवी
मानतो इतुकेच त्यांना ओळखी नुसती हवी
अर्थ ऐशा ओळखीचा सांगूच का सारा खरा
ओळखी नुसती तुम्हांशी इष्क दुसऱ्याशी खरा

३६ जा बसा घेऊन तुमच्या ओळख्या तुमच्या तुम्ही
वाटे जरी खुश्शाल माना गर्वही त्याचा तुम्ही
ओळख्या तुमच्याहुनिही आहेत जास्ती आमुच्या
एकही त्यातून नाही कामास आली आमुच्या

३७ राहून पदराआड ज्यांनी, नजरेस माझ्या बांधले
इतके बरे की त्यास तूही, आहेस पक्के बांधले
ऐसे जरी औदार्य अमुचे तू सांग त्यांना एकदा
मुक्तही करण्यास त्यांना आम्हीच येऊ एकदा

३८ यांनी तरी आव्हान आम्हां द्यावयाला नको होते
आडून तेही अंचलाच्या द्यावयाला नको होते
अंचलाने का कुणाला रक्षीले आहे कुठे
कळणार ही नाही म्हणावे होता कुठे गेला कुठे

३९ आम्हांतरी या संयमाचा आधार द्यावा लागतो
घेऊ तया पाहून काही काळ यावा लागतो
येते मनी जे काय सारे जाहीर कैसे दाखवू
केव्हातरी नक्कीच त्यांना हात आम्ही दाखवू

४० स्पर्श ना होवो तुझाही वक्षां तुझ्या म्हणुनीच या
उचलीशी हलकेच अपुल्या निखळत्या पदरास या
हे खरे की सांगणे ही नाही तुला ते चांगले
सांगतो, यांचे तरी हे लाड नाही चांगले

४१ निखळत्या पदरास अपुल्या हातही ना लाविशी
दृष्टी तरी लाजून अपुली भूतली तू लाविशी

ना कळे आम्हां तरी दोहोतली या संगती
संभ्रमी आहो अम्ही हे आव्हान का शरणागती

४२ नुसती जशी डोक्यात आली चुंबनाची कल्पना
गोऱ्या तिच्या गालावरी उमटल्या साऱ्या खुणा
पाहून हा परिणाम माझे काळीज जैसे थांबले
कल्पनेचे खेळ माझे तेथेच नव्हते थांबले

४३ दोषही याहून दुसरा नव्हता जरी माझ्याकडे
नेले तिला तात्काळ त्यांनी मॅटर्निटी वॉर्डाकडे
बोलली की आवरा कल्पनांना या अशा
कुठवरी या बालकांना जन्म देऊ मी अशा
नेऊ नको ऐसे मला चिंतनी तू सारखे
सोसेल का इतुके मला बाळंत होणे सारखे
चिंता जरी याची तशी आम्हां तुम्हां नसली तरी
वाटायला सांगा नको का लोकसंख्येची तरी

४४ ऐसे नव्हे की मी तिला केव्हाच नाही पाहिले
पाहिली आहे तशी, नाही 'तशी' मी पाहिली
पाहिली असती 'तशीही' तशीच असती पाहिली
थोडी जरी असती कुठे, एकटी 'ती' पाहिली

* *

# मृत्यू

१ ना जरी संसार सारा, रूक्ष हा होता असा
जिंकता आलाच नसता, आम्हांसही मृत्यू असा
वेगळा उत्साह काही; आज वाटू लागला
आज तर प्रत्यक्ष मृत्यू आप्त वाटू लागला

२ मृत्यूची तर हौस मजला, मेलो असा कित्येकदा
आवडे मज जन्मणेही, जन्मलो कित्येकदा
इतुकेच की एकाच वेळी एक मजला आवडे
जगता भितो मृत्यूस आणि जन्मता येते रडे

३ मृत्यूची ना खंत मजला, काय मी जगुनी करू ?
का करू इन्कार जगण्या, काय मी मरुनी करू ?
दोहोमध्ये इतुकाच दिसतो, भेद हा माझ्या मते
आहेत उघडे नेत्र आता, मेल्यावरी मिटतील ते

४ मत्तगंधाची जिथे रानवेलीची फुले
दिसतील तेथे जाण माझे प्रेत आहे गाडले
मोहुनी येतील जेव्हा भृंग त्या कुसुमावरी
जाणतो मस्तीत तेथे गातील माझी शायरी

५ काय सांगू शेवटी या जीवनाची दुर्गती
उर्ध्व होता लागला, पण हरवली नव्हती स्मृती
होते उभे बाजूस काही लौकिकास्तव सोयरे
मूल्य माझ्या जीवनांचे तेव्हा मला कळले खरे !

६ जाणतो नरकात भगवन्, लोटुनी देशील तू
उभवीन तेथे स्वर्ग मग लाजुनी म्हणशील तू
जाऊ द्या सारेच विसरा, सारेच आता जाऊ द्या
सोडिला मी स्वर्ग मजला येथेच आता राहू या

७ नाही जरी काही तसे जगता अम्हां आले तरी
मानू स्वतःला धन्य आले ऐसे सुखे मरता तरी
आता खरे उपकार आम्हां दुर्दशेचे वाटले
सोडून जाता प्राण जेव्हा काहीच नाही वाटले

८ ना जरी येतास मृत्यो दुनियेस या आमच्या कधी
लावूनियाहि फास आपणा नसतो अम्ही मेलो कधी
पाहून पण मृत्यू दुजांचा धीर येतो शेवटी
प्राशायला दुःखार्णवा आहे अगस्ती शेवटी

९ मागितले जे जे कुणी ते ते आम्ही त्याला दिले
हाच आमचा धर्म कोणा विन्मुख ना जाऊ दिले
मागसी तू प्राण आता तेही तुला देऊ आम्ही
घे जरा पाहून तेही हासुनी देऊ आम्ही

१० मेल्यावरी दुर्दैव ज्याला भोगावयाचे राहिले
नावही दुनियेत आहे त्याचेच मागे राहिले
तो पहा वाल्मिक ज्याचा ग्रंथ आम्ही जाळला
कळते जरी हे त्यास आधी त्यानेच असता जाळला

११ जाऊनही तीर्थप्रयागी काय ते मिळविन मी
ऐसे नव्हे की वेगळा मृत्यू तिथे पाहीन मी

वाटते सारेच तिथले आज मज आहे इथे
गंगा इथे, यमुना इथे, काळही आहे इथे

१२ उबगलो दुनियेस वाटे येथे पुन्हा येऊ नये
नावही दुनियेत माझे मागे कुठे राहू नये
होता मला संतोष असते इतुके जरी मी साधले
शायरीने हाय नाही हेही अम्हांला साधले

१३ चिंता जरी जन्मात मजला केव्हाच नव्हती वाटली
सरणावरी पण हाय आता या शायरीची वाटली
राहीलही मागेच नुसते बदनाम व्हायाला अम्ही
ऐसे नव्हे ना जाणतो साहित्यिकांना या अम्ही

१४ काय हे म्हणतील कोणा सांगता केव्हा न ये
म्हणतील हे नक्की उद्या ही शायरी माझी नव्हे
वाचली आधीच यांनी ग्रंथात ही कोण्या कुठे
म्हणतीलही तो ग्रंथ आता उपलब्धही नाही कुठे

* *

# संकीर्ण

१ उजळता साऱ्या जगा चंद्रा जरी आले तुला
उजळता आलाच नाही अंतरीचा तम तुला
अर्थ हाही जीवनाचा चंद्रात ज्याने पाहिला
मानू अम्ही त्यानेच आहे चंद्र काही पाहिला

२ खेळू नको बेधुंद ऐसा चंद्रा अरे ताऱ्यासवे
घे जरा लक्षात आहे रोहिणीही तुजसवे
पृथ्वीवरी असता जरी का छंद तू हा घेतला
खास तुझिया रोहिणीने डायव्होर्स असता घेतला

३ भास्करा येते दया मजला तुझी आधीमधी
आहेस का रे पाहिली तू रात्र प्रणयाची कधी

(यावर सूर्य शायराला उत्तर देतो.)

४ आम्हांसही या शायराची कीव येऊ लागते
याच्या म्हणे प्रणयास याला रात्र व्हावी लागते

५ वेचले आयुष्य नुसती आसवे गाळीत मी
वेदीवरी या वेदनांच्या यौवना जाळीत मी
उच्चारिले उत्स्फूर्त जे मी मंत्र त्या यज्ञातले
शायरी समजू नका, हे मंत्र 'त्या' यज्ञातले

६ पाहतो जेथे तिथे बेवकूफी पाहतो
पाहता अमुच्यात तुम्ही, तुमच्यात आम्ही पाहतो

हे खरे की बेवकूफी नाही कधी केली तुम्ही
काहीच ना करण्यात ऐसी आहे खरी केली तुम्ही

७ तोंडही जेव्हा कुणाला दावू नयेसे वाटते
दुनियेसही अमुच्यात काही तेव्हाच आहे वाटते
ओशाळलो नव्हतो कधी ऐसा आता ओशाळतो
सांगू खरे मी आज नुसत्या जगण्यासही ओशाळतो
आहे म्हणे सौंदर्य त्यांना या शायरीचे पाह्यचे
आहे जगाला फक्त अमुच्या ओशाळण्याचे पाह्यचे

८ भाव या ओशाळण्याचा हृद्यच ही आहे तसा
निलीमा आरक्त वदनी बेवफाईचा जसा
दु:शीलता पाहून आपुली जो असा ओशाळला
मानण्या दु:शील त्याला देवही ओशाळला

९ भारता ही दुर्दशाही ना तुला येती कधी
काँग्रेसही, ही आज ऐसी बदनाम ना होती कधी
पोसले आहेस ज्यांना शुभ्र हे हत्ती तुझे
हे तुझे सत्तांध मंत्री हे खरे शत्रू तुझे
लागू नको नादास यांच्या जनतेस या विसरू नको
स्वजनास या अपुल्याच हाती गोळ्या तरी मारू नको
ना कळे का खर्चिल्या तू गोळ्या अशा या शेवटी
होतेच हे मरणार सारे नुसत्या भुकेने शेवटी
थोडा जरी का मार्ग साधा असता तुला हा साधला
साधून ही सारी अहिंसा संहार असता साधला

समजून घे स्वजनाविना या कोणी कुठे नाही तुझा
राज्यात या आपुल्या निधर्मी देवही नाही तुझा

१० भारताची राजनीती समजण्याला लागते
षंढताही खूप, थोडी-थोडकी ना लागते
खूप केला यत्न आम्ही आम्हांस नाही समजली
ना कळो आम्हांस आहे पुष्कळांना समजली

११ नेवो स्त्रिया ओढून, त्यांना केव्हाच ना शत्रू म्हणू
काय मोठे त्यात, आम्ही मेव्हणे त्यांना म्हणू
होता असा अपहार आम्हां खेदही नाही तसा
नाही तरी षंढास त्यांचा उपयोगही नसतो तसा
सांगतो निक्षून अम्हां, शांती हवी, शांती हवी
सांगतो ती ही पुन: अमुची नको त्यांची हवी

१२ व्यर्थ का श्रमतोस चायना, युद्ध हे आता पुरे
करण्या अम्हां बरबाद अमुची नुसती अरे कॉंग्रेस पुरे
समजा जरी का वाटली तीही तुला कांही कमी
चायना, अरे देशात अमुच्या सर्वोदयी नाही कमी

१३ आता कशाची लाज आता काश्मीरही देऊ अम्ही
काय त्याने भारताचे व्हायचे आहे कमी
दिल्ली जरी गेली तरीही हार ना आम्ही म्हणू
उंचावुनी लुंग्या स्वत:च्या ' जय जगत् ' आम्ही म्हणू

१४ ऐसे नव्हे की भारती या बुद्ध नुसता जन्मला
नुसताच नाही बुद्ध येथे आहे शिवाजी जन्मला ।।१।।

वीरतेची भारती या, ना कमी झाली कधी
आमचा इतिहास नुसता इतिहास ना झाला कधी ॥२॥
तीच आहे हौस आम्हां व्हावया समरी शहीद
बाजी प्रभूही आज आहे आज जो अब्दुल हमीद ॥३॥
बोललो इतुकेच अंती ' आगे बढो आगे बढो '
देऊन गेला मंत्र जैसा ' आगे बढो आगे बढो ' ॥४॥
धर्माहुनिया श्रेष्ठ अपुल्या देशास जो या समजला
मानू आम्ही त्यालाच आहे धर्म काही समजला ॥५॥
जन्मला जो जो इथे तो वीर आहे जन्मला
अध्यात्म ही या भारताचा युद्धात आहे जन्मला ॥६॥
कुठला अरे हा पाक याचे नावही नव्हते कुठे
कळणारही नाही म्हणावं होता कुठे गेला कुठे ॥७॥
हे म्हणे लढणार यांच्या दाढया मिशा नुसत्या बघा
पाहिली नसतील जर का बुजगावणी, यांना बघा ॥८॥
पाहण्याला सैन्य त्यांचे जेव्हा आम्ही गेलो तिथे
नव्हते तिथे कोणीच होते फक्त पैजामे तिथे ॥९॥
आहे ध्वजा नक्कीच आमुची पिंडीवरी लहरायची
फक्त आहे देर त्यांनी समरी पुन्हा उतरायची ॥१०॥
हाच आहे ध्यास आता अन्य ना बोलू आम्ही
बोलू आम्ही जयहिंद आणि जयजवान बोलू आम्ही।११।

* *

# दार्शनिक

१ बोलाविते हे विश्व तेव्हा, विश्वाकडे पाहू अम्ही
ना तरी, नुसते आपुले, अपुल्याकडे पाहू अम्ही
द्रष्टुत्व अमुचा धर्म, आम्हां पाहाण्या काही हवे
ना म्हणू केव्हाच आम्ही, हे नको, अन् ते हवे

२ बूटही माझे पुसाया, नव्हती जयाची पात्रता
लेस मी त्यांच्या बुटांची, बांधतो आहे आता
हासतो गालांत जेव्हा, येतात नयनी आसवे
कळते मला, की मी खरा, हाही नव्हे तोही नव्हे

३ कोणीच ना येथे कुणाचा, आम्हांसही कळते तसे
दोस्तहो, समजूनही हे वागायचे नसते तसे
मानू आम्ही, की सुज्ञतेने, तोच आहे वागला
समजूनही वेदान्त सारा, नाही तसा जो वागला

४ एकटा मज पाहण्याला शर्थ मी केली पुरी
दूर मी नेले मला, रानीवनी, विजनी तरी
तेथेही नाही एकटा, द्वैत वासुनि 'आ' उभे
नाशिता द्वैतास होते, शून्य मज खाया उभे
कंटाळलो द्वैतास मी, मज धाक शून्याचा उरी
नाकळे जाऊ कुठे, दोन्हीकडे दिसते सुरी
शेवटी संतापलो, अन् ब्रह्मांड ग्रासुनि बैसलो
द्वैत गेले, शून्य गेले, एकटा मी राहिलो

५ अजवरी स्वप्नात होतो, जाग आता ये मला
जाग कसला ? हा, खरोखर जागही स्वप्नातला

६ 'सारेच आहे स्वप्न येथे' मानतो 'हे' सत्य मी
हाय पण वेदान्तही हा, वाचला स्वप्नात मी

७ अंतरीचा तम जरासा उजळावयाचा राहिला
आहे अविद्या लेश काही ज्ञानोत्तरी ही राहिला
इतुका जरी अध्यात्म कोणी चंद्रात आहे पाहिला
मानू आम्ही, त्यानेच आहे चंद्र काही पाहिला

८ आहे जरी हे स्वप्न खोटे, हेच प्रिय मज वाटते
काय सांगू भय मनाला, जागृतीचे वाटते

९ वैतागुनि या जीवनाला, अभ्यासिला वेदान्त मी
आणि समजू लागलो की प्रत्यक्ष केवळ ब्रह्म मी
हाय ! माझे ब्रह्म ही आता रडाया लागले
कळले मला मी फक्त, माझे नाव नुसते बदलले

१० सांगता की सर्व खोटे, काहीच ना येथे खरे
इतुके बरे हे सर्व खोटे हे तरी आहे खरे

११ जे दिसे प्रत्यक्ष तेही, आहे जरी खोटे असे
अदृश्य त्या देवास सांगा, सत्य मी मानू कसे ?
आहे जरी साराच भ्रम हा, काय हा आहे कमी ?
यापुढे जाऊन दुसरा का करू निर्माण मी ?

१२ 'आज' माझे नाव आहे, आहे उद्याचा 'काल' मी
कालचा आहे 'उद्या' ना मी 'उद्या' ना 'काल' मी
'आज' माझे नाव आहे मी वर्तमानी राहतो
भूत, भावी शब्द तुमचे ऐकून गाली हासतो
आहो जसे आसमान आहे, निष्कंप मी सांगू किती
फिरविता मज व्यर्थ, म्हणता काल चक्राची गति
जाणतो की व्यर्थ आहे माझे तुला समजाविणे
इतुकेच आहे ज्ञान तुमचे, भलत्यास भलते समजणे

१३ नष्ट झाला मोह जेव्हा वाचिली मी दर्शने
आनंदलो क्षणमात्र ऐशा सत्याचिया त्या दर्शने
सांगूच का आतातरी काय जे वाटे खरे
आहे उराशी दुःख आता मोहनाशाचे खरे

१४ जेव्हा उपाधी बंधनांना सोडून आम्ही पाहिले
भलतेच काही रूप तेव्हा अपुले स्वतःचे पाहिले
दचकलो पाहून माझ्या शून्यसम रूपा तशा
शेवटी गुंडाळल्या मी चिंध्या जशा होत्या तशा

१५ स्वीकारल्या जेव्हा उपाध्या होत्या तशा सान्या पुन्हा
झाली तयारी पूर्ण जेव्हा आत्मघाताची पुन्हा
आता पुन्हा निःशंक सारे शास्त्र पाहू लागलो
व्हावयाला मुक्त काही मार्ग पाहू लागलो

१६ वाचून ही वेदांत आले हेच हाती शेवटी
हाय मी भ्यालो स्वतःच्या चिन्मात्र रूपा शेवटी

दोषही याचा तसा नाही मला मी लाविला
वंदुनिया अज्ञान नुसता हात भाली लाविला

१७ समजू नका की व्यर्थ त्याने वार्धक्य हे आम्हां दिले
आहे जसे वरदान काही निवृत्त व्हायाला दिले
इंद्रिये विषयास अपुल्या भोगून मागे परतली
सेना जशी विजयोत्सवाला मायदेशी परतली
वेल ही या वासनेची ठायीच आहे बहरली
आज ती निर्वासनेच्या भगव्या फुलांनी बहरली
कृत कृत्यतेच्या आसवांनी आहे अम्हांला नान्हिले
सम्राटपदी जैसे कुणाला गंगोदकाने नान्हिले
इंद्रिया वाचून ज्याला येईल काही भोगता
दोस्तहो, वार्धक्यही हे त्यालाच येते भोगता

१८ नुसतेच आहे स्वप्न आहे भास हा नुसता खरा
स्वप्न ही नाही खरे, ना पाहणाराही खरा
ऐसे जरी, हे स्वप्न जेव्हा अम्हां रडाया लावते
मूर्खता रडण्यातली या, जास्ती रडाया लावते

१९ चेहरा जेव्हा स्वतःचा दर्पणी मी पाहिला
सांगतो प्रत्यक्ष तेथे हनुमान आम्ही पाहिला
मिचकावुनी डोळे मला तो फक्त इतुके बोलला
वेड्या अरे आता कुठेही राम नाही राहिला

२० कंठ झाला रुद्ध त्याच्या नयनांत आली आसवे
आली मलाही कीव आली अमुच्याही नयनी आसवे

बोललो रामास का या दुनियेत असते पाहृयचे
म्हणशील केव्हा राम आहे इतुकेच आता पाहृयचे
भोगिले आहेच सारे भोगावया जे जे हवे
काय नाही भोगिले तू आज जे वाटे हवे
संतृप्त का मरतो कुठे नुसता इथे तो झोपतो
झाल्यावरी स्तनपान जैसे बाळ तान्हा झोपतो
मृगजळाचा भास जैसा रेतीवरी या सारखा
तैसाच साऱ्या जीवनाचा मृत्युवरी या सारखा
हाच आहे सत्य याला कोणी जरी ना पाहतो
स्वप्न साऱ्या जीवनाचे हाच अपुले पाहतो
स्वप्नातल्या त्या आकृतीला तू रूप आपले समजला
म्हणतो सही वरतून आम्हां वेदान्त आहे समजला
मारुते सांगूनियाही समजेल का तुजला कधी
आकृत्या स्वप्नातल्या का जन्मल्या मेल्या कधी
आता जरा मी त्यास गाली हासतांना पाहिला
दर्पणी नाही पुन्हा तो हनुमान आम्ही पाहिला

* * *



भाऊसाहेब पाटणकर

ॲडव्होकेट भाऊसाहेब पाटणकर महाराष्ट्रातील एक सुप्रसिद्ध व्यक्तिमत्त्व दिल्ली ते हैद्राबादपर्यंत 'मराठी शेरोशायरी'च्या शेकडो मैफिली आत्मविश्वासानं जिंकणारा एकमेव कलंदर. शिकार, संगीत, अध्यात्म अशा वेगवेगळ्या क्षेत्रात समरसून जाणारा, उर्दू काव्याचा कैफ मराठी भाषेत निर्माण करणारा एक विलक्षण जिंदादिल. शृंगार ते अध्यात्मापर्यंत जीवनाच्या विविध टप्प्यांची वाटचाल रसिकतेनं आणि डोळसपणे करणारा एक वाटसरू.

त्यांच्या कवितेत उर्दू कवितेची धुंद आहे पण तिची 'लगन' मात्र अस्सल 'मऱ्हाटी'शी आहे. त्यांची चिंतनशीलता प्रत्येक शेरातून जागवते, नव्हे प्रत्येक रसिक हृदयाचा ठाव घेते.

'मराठी शायरी', 'मराठी मुशायरा', 'मैफिल' आणि यापूर्वीच्या कलाकृतींना भाग्यवंत रसिकांनी अमाप दाद दिली. आता 'जिंदादिल' ही रसिकांची अशीच अशीच 'वाहवा' घेईल.